श्री

# हेममुक्तासंवाद.

हा ग्रंथ,

## चिंतामण गणेश जोशी

यांनीं रचिला,




तो,

मालकांनीं निर्णयसागर छापखान्यांत छापवून
प्रसिद्ध केला.

---

हा ग्रंथ सन १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें रजिष्टर केला आहे.

मुंबई.

इ० स० १८८७.

---

किंमत रु० १।.

# हेममुक्तासंवाद.

## उपोद्घात.

ह्या ग्रंथाचें नांव हेममुक्तासंवाद. हा नाटकरूपानें कल्पिला आहे, यांत सुवर्णादिक धातु व मौक्तिकादिक रत्नें यांचा परस्पर वाक्कलह हाच मुख्यार्थ असून त्याच्या अनुरोधानें न्याय, धर्म आणि नीतिदर्शक सुभाषित यांचा बहुतेक ठिकाणीं समावेश केला आहे.

ह्या ग्रंथाचे तीन भाग केले आहेत. पहिल्यांत व दुसऱ्यांत धातुरत्नांचा अन्योन्य मर्मभेदक विवाद आणि अंतिमभागांत राजाधिराज श्रीरामचंद्रराजाकडून उभयवर्गांचा संधि अशी याची रचना केली आहे. ह्या ग्रंथांत कोणत्याही रसाचें परिपूर्ण वर्णन जरी आलेलें नाहीं तथापि अंत्यभागांत शृंगार, वीर, करुणा, हास्य, भयानक इत्यादिक रस प्रसंगानुसार अंशतः दाखविले आहेत.

हा ग्रंथ रचण्यास कारण असें झालें कीं 'स्वर्णमुक्तासंवाद' या नांवाचा लहानसा ग्रंथ कोणी एका कवीनें संस्कृत भाषेंत केलेला हल्लींच या पुस्तकाच्या कर्त्याच्या शोधांत आला. त्या ग्रंथाचे सरासरीस साठ श्लोक असतील. तो ग्रंथ पहातांच तशाच तऱ्हेचा गद्यपद्यात्मक ग्रंथ प्राकृत भाषेंत चांगला विस्तृत करावा अशी वासना ह्या कर्त्याच्या मनांत उत्पन्न होऊन त्यानें हा ग्रंथ यथामति तयार केला.

ह्या नूतन रचनेंत त्या संस्कृत ग्रंथाचा कोठेंकोठें आश्रयही घेतला आहे.

ह्या ग्रंथांत धातुरत्नांचा संधि करण्याच्या कामीं श्रीरामराजाची योजना करण्याचें प्रयोजन हेंच कीं अखिलजगाचा उत्पादक व नियंता जो परमेश्वर त्याचा जगन्नियमनासाठीं अवतार आहे; याकरितां जगाच्या नियामकत्वाचा अधिकार त्या जगदीश्वरावांचून अन्यास तादृश शोभणार नाहीं ह्मणून या धातुरत्नांच्या कलहाचा निवाडा करण्याच्या कामांत त्याचीच कल्पना केली. आतां या कल्पितग्रंथांत त्या परमेश्वराची कथा आणणें हें केवळ प्रशस्त दिसत नाहीं असें कोणी एकादे वेळीं ह्मणतील, तर त्यांस एवढेंच सांगणें आहे कीं खोट्यास शोभा येण्याकरतां कांहीं तरी खरेपणाचा भाग त्यामध्यें मिळविला पाहिजे. त्यावांचून खोट्या पदार्थावर लोकांचें मन बसणार नाहीं. पहा, हा मायाकल्पित प्रपंच खोटा आहे आणि परमेश्वर मायातीत व सत्यरूप आहे, परंतु त्या परमेश्वरानें या असतापासून उत्पन्न झालेल्या प्रपंचांत नानाप्रकारचे अवतार धारण केले आणि यास शोभविलें. तो जगदात्मा सर्वव्यापक उच्च, नीच, सत्, असत् इत्यादि सर्व पदार्थमात्रांत भरूनच राहिला आहे याकरतां या कल्पितग्रंथांत त्याचें वर्णन आणणें हें अप्रशस्त असें विद्वान् लोक बिलकुल ह्मणणार नाहींत अशी ग्रंथकर्त्याची पूर्ण खात्री आहे. आतां या ग्रंथांत भगवद्भीला आणण्याचें दुसरेंही एक कारण मुख्य आहे तें असें कीं

वाचकांचें मनोरंजन करण्यास कवितेंत नानाप्रकारें अलंकार करणें हा गुण कवीच्या अंगीं मुळींच नाहीं. याकरितां रामकथेचा भाग या कवितेंत अवश्य घ्यावा लागला. ही कवितास्त्री वेडीवांकडी जरी असली तथापि या अलंकारानें अलंकृत असल्याकारणानें रसज्ञांच्या चित्तास रमविल्यावांचून रहाणार नाहीं असा पूर्ण भरंवसा धरिला आहे.

ह्या ग्रथांत पूर्वापर संबंधाचा विचार केला तर बहुतेक ठिकाणीं दोष येईल परंतु पंडितांनीं ग्रंथाच्या स्वरूपाकडे लक्ष्य पुरवून दोषाचें निवारण मानून घ्यावें.

पूर्वींच्या कविश्रेष्ठांनीं नानाप्रकारचे रसभरित ग्रंथ उत्पन्न केले आहेत. त्या रसांत निमग्न असणाऱ्या विद्वानांपुढें हा क्षुल्लक ग्रंथ अर्पण करणें हें कुबेरापुढें कवडी ठेवण्यासारखें आहे. तथापि कर्त्याचा उद्देश असा कीं जे रसज्ञ निरंतर मधुर पदार्थांचें सेवन करणारे ते एकाद्या प्रसंगीं आंबट किंवा तिखट अशा पदार्थांचाही आदर करीत असतात. त्याच प्रमाणें या ग्रंथावरही विद्वान लोक आदर ठेवतील या आशेनें हा ग्रंथ विद्वानांपुढें सादर केला आहे, तर विद्वानांनीं आपल्या सौजन्याकडे लक्ष्य द्यावें आणि या कृतींत परमाणूपेक्षां सूक्ष्म जरी गुण असले तथापि ते पर्वतासारखे मानून त्यांचा आदर करावा अशी या कर्त्याची प्रार्थना आहे, ती परमेश्वर सुफल करो.

---

# हेममुक्तासंवाद.

## अंक १.

### मंगलाचरण.

श्लोक ( शार्दूलविक्रीडित. )

ज्यातें याज्ञिक यज्ञयागविधिनें आराधिती सर्वदा
अंत:सद्मिं मुमुक्षु शोधिति सदा ज्याची कला सर्वदा[1] ।
जो प्रत्यूहमहाब्धि[2]वाडव निजानंदाप्तिचा[3] सन्निधी[4]
तो हेरंब करो मदीय रसना[5]नृत्यांगणीं सन्निधी ॥ १ ॥

श्लोक ( स्रग्धरा. )

ज्या योगी स्वांतपद्मीं[6] स्थिर करिति जितश्वास[7] अष्टांगयोगें
ब्रह्मेंद्राग्न्यर्कवाय्वादिक[8] जगदवना[9] तिष्ठती यन्नियोगें[10] ।
तो लक्ष्मीकांत कांताधरमधु[11]मधुलिट् कामिकामप्रदाता[12]
सर्गस्थित्यंतकर्ता[13] मम हृदयिं वसो नित्य भक्तार्तिहर्ता[14] ॥२॥

---

१ सर्व देणारी. २ प्रत्यूह ह्मणजे विघ्नें हाच मोठा सागर त्याच्या शोषणाविषयीं वडवानल. ३ स्वानंदप्राप्तीचा. ४ सम्यक्-निधि, उत्तम ठेवा. ५ माझी जिव्हा हेंच नृत्यांगण त्याचे ठायीं. ६ हृदयकमळीं. ७ वायूचा निरोध करणारे. ८ ब्रह्मा-इंद्र-अग्नि-अर्क-वायु आदिकरून देव. ९ जगत्-अवना, जगाच्या रक्षणाविषयीं. १० ज्याच्या आज्ञेनें. ११ कांतेचें अधरामृत प्राशन करण्याविषयीं भ्रमरासारखा. १२ याचकांची कामना पूर्ण करणारा. १३ सृष्टिस्थितिलय करणारा. १४ भक्तांची पीडा दूर करणारा.

श्लोक (शिखरिणी.)

शतार्धाऽकारा[1]द्यक्षरवरसमाम्नायविहिता
सितांभोजा[2]लंबा वरदकर[3]कंजा कविहिता[4] ।
शरच्चंद्रस्वच्छा धवलवसना पुस्तकधरा
सुवीणा जिव्हाग्रीं वसुं विधिकुमारी मलहरा ॥ ३ ॥

(असें मंगलाचरण झाल्यानंतर)

**सूत्रधार**—(पुढें येतो) पुरे, पुरे, एवढ्यानेंच अभीष्ट-देवता प्रसन्न होतील. (पारिपार्श्वकाप्रत) मारिषा, आतां पुढें या ठिकाणीं बरीच पंडितांची सभा जमणार आहे. त्यांत नानाप्रकारचीं विनोदपर सुरस भाषणें होतील तीं आमच्या कर्णरंध्रांत प्रवेश करून निःसीम आनंद करितील यांत संशय नाहीं. ज्या ठिकाणीं विद्वानांच्या वाक्तरंगिणीचा अस्खलित प्रवाह चालतो त्या ठिकाणीं सहज सर्व रसांचा आविर्भाव होतो व श्रोत्यांच्या चित्तास चैन न देणाऱ्या अशा क्षुधा, तृषा, निद्रा, आलस्य, भय, शोक इत्यादि सहस्रशः जरी अडचणी असल्या तरी त्या पंडितांच्या वक्तृत्वसूर्यापुढें अंधकाराप्रमाणें मुख सुद्धां न दाखवितां दिगंताला पळून जातात. अशा पंडितांचा आज वचनसंप्रयोग होण्याचा संधी तुझ्या भाग्योदयानें प्राप्त झाला आहे तो दवडूं नको. सावधान चित्तानें ऐकून कर्णांचें साफल्य कर.

---

१ शतार्ध-अकारादि-अक्षर-वर-समाम्नाय-विहिता, पन्नास जीं अकारादि अक्षरें त्यांचा जो उत्तम समूह तेणेंकरून रचलेली. २ शुभ्र कमलाचे ठायीं आश्रय जिचा. ३ वर देणारें करकमल जिचें. ४ ग्रंथकर्त्याच्या हिताविषयीं.

**पारिपार्श्वक**—छे! छे! हा अलभ्य लाभ अयत्नतः प्राप्त झालेला म्यां सोडून दिला तर हस्तगत झालेल्या अमृताचा तिरस्कार करणाऱ्या अभाग्याप्रमाणें सुज्ञ मला कपाळकरंटा ह्मणतील. 'आपला नाश आणि जगाचा हास' कोणीं करून घ्यावा?

**सूत्रधार**—शाबास! मारिषा, शाबास! तूं मोठा रसिक आहेस. (इतक्यांत सेवक येऊन सभेंत यथायोग्य बसण्याचा बंदोबस्त करितो, व यथाधिकारें पंडितांसह सभ्य सभास्थानीं बसतात)

**एक सभ्य**—पंडितहो, आजचा मोठा सुदिन आहे. या दिवसासारखा दिवस या अर्वाचीन कालांत कोठेंच अवलोकनांत आला नाहीं. '**चकास्ति योग्येन हि योग्यसंगमः**' योग्यांशीं योग्यांचा संगम फारच शोभत असतो. आपण पंडित आणि हे सभ्य यांचा यथायोग्य समावेश झाल्यानें आज या ठिकाणीं होणारी प्रश्नोत्तरकर्णिका[1] श्रोत्यांच्या कर्णांस अलंकृत करील यांत संशय नाहीं. पंडित महाराज, तुह्मी असें पहा, पुरुषाला समयोचित वाणी जशी शोभवीत असते त्याप्रमाणें केयूरकटकादि अलंकार शोभा देत नाहींत; तसेंच स्नान, विलेपन, केशप्रसाधन, वस्त्र, कुसुम इत्यादि उपचारही तादृश भूषण देत नाहींत. त्यांत ती वाणी संस्कृत जर असेल तर तिच्या पुढें हीं पूर्वोक्त भूषणें तेजोहीन होतात. एका कवीनें ह्मटलें आहे कीं,

---

१ प्रश्नोत्तर हेंच कर्णभूषण.

**'वाण्येका समलंकरोति पुरुषं या संस्कृता धार्यते । क्षीयंते खलु भूषणानि सततं वाग्भूषणं भूषणं.'** हें त्याचें वाक्य यथार्थच आहे; ह्मणजे पहा, एक वाणीच मधुर असली ह्मणजे कितीही अवगुण असले तथापि ते तिच्या ओघांत मिळून जाऊन दिसेनातसे होतात **'अस्ति चेन्मधुरा वाणी प्रकाशंते न दुर्गुणाः । नो चेद्गुणैर्विहीनोपि पिको लोकप्रियः कथं.'** महाराज, आपल्यासारख्या विद्वानांपुढें एकादें वाक्य ह्मणण्यास माझ्यासारख्या अनभिज्ञास फारच अवघड आहे, कारण मी अगदींच अनभ्यस्त आहें. उगीच आपल्या सारख्या पंडितांचा सहवास कधीं कधीं घडतो इतक्यावरूनच अशा तऱ्हेच्या प्रकरणांत एकाद्या वेळीं शिरकटून ध्यावें असें वाटतें; परंतु यांत जीव मुळींच नाहीं, याकरितां या भाषणांत बहुतेक ठिकाणीं अपभ्रंश झालेच असतील त्यांविषयीं मात्र क्षमा असावी.

**पंडित**—छिः, छिः, अपभ्रंशाचा लेश ही नाहीं. तुह्मीच आपल्या मुखानें सांगतां ह्मणून मात्र अनभ्यासी ह्मणावें. अस्तु, आपलीं माधुर्यरसयुक्त भाषणें आणखीही ऐकण्याविषयीं कर्ण प्रफुल्लित आहेत यास्तव विवक्षितविषयाची समाप्ति होऊं द्या.

**सभ्य**—हां, आज्ञा झाली, आतां चिंता नाहीं. पंडितमहाराज, हा कोकिल पाहिला असतां ओतप्रोत अवगुणांनींच भरलेला आहे; गुणाचा लवसुद्धां दिसत नाहीं. आरंभीं, रूप पाहिलें तर कोळशाचा सारच काढून ओतविला आहे काय

असा भास होतो. किती बिचारा सुंदर तरी! पुढें नेत्रांकडेस पाहिलें तर जणू निरंतर आरक्त झालेल्या क्रोधदृष्टीनें सर्व लोकांस अवलोकन करितो! केवढा शांतवृत्ति! एकाद्या वेळीं परकीय पक्ष्यांचीं पिलें दृष्टीच्या समोर गेलीं तर चंचूच्या प्रहारानें टोंचून तत्काल त्यांचे प्राण घेतो! किती कृपाळु! दयेची कोंडच! जो दुष्ट आपल्या अपत्याचें पालन करीत नाहीं तो परापत्यावर काय दया करणार? पंडितराज, कोकिलास परभृत[1] ह्मणतात हें आपल्यास विदित आहेच. कोकिलानें अंडीं घातलीं कीं तिकडे तो पहातो कशास? झालीं वायसांच्या आधीन. मग त्यांचें पालन पोषण त्या वायसांला करावें लागतें. एवंच हा कोकिल दुर्गुणांच्या रसाचा ओतलेला पुतळाच असून केवल सुरसवाणीच्या योगानें सर्व लोकांचा आवडता होऊन गेला आहे. पहा त्याच्या एवढ्या अवगुणांपैकीं एकही लोकांच्या स्मृतींत शिरत नाहीं. इतका सुरसवाणीचा प्रभाव लोकोत्तर आहे. मग ती तर आपल्याकडेस परिपूर्ण भरलेली असून इतर गुणांचाही लेशमात्र कमीपणा नाहीं. तस्मात् आपल्यासारख्यांच्या वक्तृत्वमेघवृष्टीनें या सभास्थित लोकांचे कर्णचातक निष्प्रतिबंध तृप्त होतील. यास्तव आज सुदिन आहे, यांत संशय नाहीं.

**पंडित**—वः शाबास, सभासद, उगीच आह्मांस उचलून उचलून आपटूं नका. आह्मीं कांहीं तसे वक्ते नव्होंत. परंतु एक वाणी जर सुरस आहे तर ती सर्व हारादि अलंकारांचा

१. परांनीं पोषलेला.

तिरस्कार करून पुरुषाला भूषित करिते व त्या वाग्रूप सद्गुणाच्या पटलांत इतर संपूर्णही अवगुण दडपून जातात असें जें आपण आरंभापासून प्रतिपादन केलें हें मात्र यथार्थ आहे. यावर एका कवीची उक्ती सुद्धां मला आठवली. ती ही:—

पिकस्तावत्कृष्णः स्वयमरुणया पश्यति दृशा
परापत्यद्वेषी स्वसुतमपि नो पालयति यः ।
तथाप्येषोऽमीषां सकलजगतां वल्लभतमो
न दोषा गम्यंते खलु मधुरवाचां क्वचिदपि ॥ ४ ॥

हें पद्य बरोबर आपल्याच भाषणाला अनुसरून आहे. परंतु पंडिताचें वक्तृत्व ह्मटलें ह्मणजे पराधीन आहे; कारण त्यास रसिकांचें सान्निध्य अवश्य असलें पाहिजे. ह्मणजे, तें असेल तरच कवीच्या चित्तास अत्यंत आनंद होतो, आणि तें नसेल तर वक्त्याचे आलाप अत्यंत रसयुक्त असतांही अरसिकाकडेस विलाप होतात, आणि तेणेंकरून त्याच्या अंतःकरणसागरास कांहीं उल्हास न होतां त्याचें केवळ कंठशोषण मात्र होतें. मग त्यासारखा पश्चात्ताप आहे काय ? नाहीं बरें, सभ्यमहाराज ?

**सभ्य**—होय होय, तें यथार्थच आहे. असें पहा, एकादा सावकार महा प्रयास करून व्यापारासाठीं नानावस्तूंचा संग्रह करितो, आणि त्याला तत्समान योग्य ग्राहक मिळून वस्तूंचा सुप्रयुक्त व्यय झाल्यानें त्याच्या चित्तास अत्यंत आनंद होऊन मोठ्या उत्साहानें अधिकाधिक वस्तूंचा

संग्रह करून पूर्वीपेक्षां उद्योग वाढविण्यास तो व्यापारी झटत असतो. तद्वत् चंद्रोदयीं जसा सागरास उल्हास होतो, तसा सुरासिकांच्या सान्निध्यानें वक्तयाच्या चित्तास उत्कर्ष होऊन अतिशयित वाग्वल्लरीचा प्रसार होतो हें उघडच आहे.

**पंडित**—शाबास, भले, आपल्यासही यांत बराच अनुभव आहे. वः ! प्रत्ययसिद्ध भाषणाचा काटच निराळा. असो, तात्पर्य हेंच '**कविः करोति पद्यानि लालयत्युत्तमो जनः। तरुः प्रसूते पुष्पाणि मरुद्वहति सौरभं.**' याचा अर्थ उघड आहे, परंतु असंस्कृतज्ञांस ज्ञान होण्याकरितां कांहीं बोलतों. चांगल्या मनोरम्य बागेंत एकादा बकुलादि वृक्ष प्रफुल्ल झालेला असावा ह्मणजे त्याचा तो मनोहर सुगंध मंदमारुताच्या सहायानें जसा इतस्ततः प्रसृत होतो त्याचप्रमाणें कवीच्या उक्तींचा प्रसार रसज्ञापासून होतो. आतां, जे लोक रसिकत्व नसतांही वक्तयाच्या भिडेकरितां अथवा महत्त्व मिळविण्याकरितां मोठ्या डौलानें श्रवणार्थ बसतात त्यांचें तें रसानभिज्ञ अंतःकरण त्यांत मुळींच रमत नाहीं. गुणज्ञहो, तुह्मी असें पहा, एकाद्या विलासिनी स्त्रीनें कामशास्त्रोक्त हावभावादि लीलाविलास प्रकट केले असतां विलासी तरुण पुरुष अंगचलनादि व्यापारही विसरून त्याच रसामध्यें गर्क होऊन जातात. त्यांचें अंतःकरण त्या विलासवती रमणीच्या इतकें आधीन होऊन जातें कीं त्यांनां देहस्मृतीसुद्धां नसते. ह्मणून अरतिज्ञ कुमारांस ते विलास आवडतील काय? व त्यांच्या पुढें विलास करण्यास त्या ह्

तरी हृदयांत शृंगाररसाचा आविर्भाव होईल काय? कदापि होणार नाहीं. 'कवयः परितुष्यंति नेतरे कविसूक्तिभिः। न ह्यकूपारवत्कूपा वर्धंते विधुकांतिभिः.' अर्थात् कवीच्या सद्वाणीनें कवीलाच आनंद होतो, इतराला होत नाहीं. याविषयीं वाक्यकर्त्यानें दृष्टांत घेतला आहे तो असाः—चंद्रोदय झाला असतां सागर मोठ्या हर्षानें वृद्धिंगत होतो, परंतु कूपास तत्संबंधी वृद्धीचा विकार कांहींच होत नाहीं. याकरितां विद्वानांस अरसिकापुढें पांडित्य करण्याचा प्रसंग आणि विलासवतीस अरतिज्ञापुढें विलास करण्याचा प्रसंग हे दोनही अशस्त्रवधच आहेत. आतां विद्वानास रसज्ञ मिळाले असतां जो आनंद होतो त्यास रहाण्यास सागरा सारिखें जरी पात्र मिळालें तथापि तेंही कमीच. आज या ठिकाणींही तोच प्रमोदाचा प्रसंग घडलेला आहे. कारण विद्वानाचा परिश्रम जाणणारे आपल्यासारखे बरेच सभ्य या ठिकाणीं मिळालेले आहेत. मग असा प्रसंग मिळाला तर पंडितांस काय तोटा? हा एक भाग्योदयच मानावयाचा महाराज. 'गुणैः सर्वज्ञकल्पोपि सीदत्येको निराश्रयः। अनर्घ्यमपि माणिक्यं हेमाश्रयमपेक्षते.' ह्मणजे अमूल्यही जरी रत्न असलें तथापि त्यास हेमाच्या आश्रयाची गरज लागते; तें सुवर्णाश्रयावांचून जसें शोभत नाहीं, तद्वत् पुरुष गुणेंकरून सर्वज्ञकल्प जरी असला तथापि तो जर निराश्रय आहे तर फारच दुःख पावतो आणि त्याला आश्रय मिळाला असतां तो फारच शोभतो. तस्मात् विद्वानाचें वाक्पटुत्व रसिकाश्रयानें सुफल होऊन जातें.

**सभ्य**—(आपल्याशीं) हां, हां, विसरणार होतों, परंतु या पंडिताच्या वाक्यावरून बरेंच स्मरण झालें. (मोठ्यानें) पंडितराज, मी फार दिवसांपासून आपल्यासारख्या पंडितांपुढें एक प्रश्न ठेवावा ह्या विचारांत आहें; परंतु गांठ पडली कीं इकडच्या तिकडच्या गोष्टी समोर येऊन ठेपल्या, ह्मणजे मग कोठचा प्रश्न ह्याचें स्मरणच त्या वेळीं होत नाहीं. परंतु आज दैववशात् आपल्याच मुखांतून **'अनर्घ्यमपि माणिक्यं हेमाश्रयमपेक्षते'** असें पद्योत्तरार्ध निघण्याबरोबर स्मरण झालें. पंडितराव, मला एका चांगल्या मनुष्यानें असा प्रश्न केला कीं सुवर्ण आणि मौक्तिकादिक रत्नें यांमध्यें कोणत्या वस्तूच्या ठायीं श्रेष्ठत्व मानावें? सुवर्णाची योग्यता विशेष कीं रत्नाची? असा प्रश्न करतांच काय सांगूं, शास्त्रीबुवा, मी कांहींसा कुंठित झालों. परंतु त्या प्रसंगीं शांतिरस्तु पुष्टिरस्तु करून सरासरी त्या पृच्छकाची समाधानी केली; आणि तो जरासा भोळसर होता ह्मणूनच आमची ती लटपट चालली आणि तेवढ्यानेंच तो समाधान होऊन गेला, परंतु माझ्या मनाची खात्री झाली नाहीं. आपल्या हो मनास कोण फसवील? तस्मात्, हे पंडितवर्य, हा प्रश्न आमच्या सारखा आपणास दुर्ज्ञेय होणार नाहीं, करा तेवढें आमचें समाधान.

**पंडित**—अहो सभ्य, तें असें आहे. ईश्वरसृष्ट जे पदार्थ त्यांमध्यें एकच पदार्थ सर्वकाल श्रेष्ठ ठरविला जात नाहीं. त्याविषयीं देशकालव्यवस्था पाहिली पाहिजे. ए-

कादा पदार्थ श्रेष्ठ असून विशिष्ट देशीं किंवा कालीं निरुपयोगी होतो. अशा प्रसंगीं तो वरिष्ठ असून कनिष्ठ मानिला जातो. तसाच प्रसंगानुसार निकृष्ट पदार्थाचाही मोठ्या स्थानीं सदुपयोग होऊन तो अत्यंत उत्कृष्टतेस पोहोंचतो. तस्मात् देशकालव्यवस्थानुरूप भगवत्सृष्ट पदार्थांस उच्चनीचत्व प्राप्त होतें. एकाद्या प्रसंगीं अल्प वस्तूचीच सापेक्षता असते. त्याचे जागीं श्रेष्ठ वस्तूची योजना केली असतांही कार्यसिद्धी होत नाहीं. उलट नाश मात्र होतो. महाराज मी उगीच अनुभवावांचून बोलतों असें समजूं नये. हा विषय बहुधा सर्वांलाच अनुभूत असेल व कवीश्वरांनींही बहुत ठिकाणीं उद्घोषित केला आहे. 'अल्पानामेव वस्तूनां प्रयोजन उपागते। महांतोऽपि पदार्थास्तन्न निवर्तयितुं क्षमाः.' गुणज्ञहो, असें पहा, ज्या वेळीं आपणास दांत कोरण्याचा प्रसंग येतो त्यावेळीं लहानशी काडीच पाहिजे, मोठे स्थूणास्तंभ उपयोगीं पडतील काय? तसेंच अतिशयित तृषेच्या प्रसंगीं तृषानिवारणार्थ शर्करायुक्त गाईचें दुग्ध उपयोगीं पडेल काय? नाहीं, त्यावेळीं उदकच पाहिजे. असो, असे दृष्टांत शतशः सांपडतील; परंतु स्वल्पार्थसिद्धीविषयीं अतिविस्तार करावा यांत अर्थ नाहीं. विस्तार अल्प असून अर्थ अनल्प असावा याचेंच नांव पांडित्य. तथापि एकच पदार्थ निरंतर मान्य नसतो याविषयीं एका कवीचें सुंदर वाक्य आठवलें तेवढें बोलतों. विस्ताराची माफी असावी. 'यद्यद्दतौ पदार्थां ये सुखयंत्य-

नलादयः । अपतौ ते विषायंते लोके कः सुखदोऽनिशं.’ तात्पर्य, शिशिर किंवा हेमंत ऋतूमध्यें अग्नि हा पदार्थ सर्व लोकांस अमृततुल्य सुखकर वाटतो. ‘अमृतं शिशिरे वन्हिः’ असें वाक्य आहेच. परंतु तोच वन्हि वसंतादि ऋतूंत विषतुल्य असह्य होतो. त्याचप्रमाणें उष्णकालांत गार पाण्यांत प्रवेश केला तर अमृतडोहांत निमग्न झाल्यासारखा आनंद होतो. तें प्राशन केलें तर किती सौख्य वाटतें ! परंतु तेंच उदक हिमागमकालीं अगदींच अप्रिय होतें. याकरितां एक पदार्थ सर्वकालीं सारखा उपयोगीं पडणारा असा ब्रह्मांडांत नाहीं आणि श्रेष्ठत्व नीचत्व मानणें हें उपयोगानुसारच आहे, अतएव योग्यत्वाची एकत्र एकान्तस्थिती आहे असें वाटत नाहीं.

**सभ्य**—पंडित महाराज, वक्तृत्वाचा बराच भडिमार करून शेवटीं श्रेष्ठत्वाची एकत्र स्थिति नाहीं असें आपण सिद्ध केलें, तथापि यावर पुनरेव माझा आक्षेप आहे. परंतु विषाद नसेल तर—

**पंडित**—तो कोणता आक्षेप अवश्य बोला, त्याविषयीं आह्मांला राग नाहीं.

**सभ्य**—मी असें ह्मणतों, प्रत्येक पदार्थाचा सर्वकालीं जरी उपयोग नसला, तथापि ज्या पदार्थाचें मौल्य विशेष आहे तो श्रेष्ठ मानण्यास कोणता प्रत्यवाय ?

**पंडित**—छिः छिः, तसें मानलें तर अगदींच अनवस्था होईल. तुह्मी असें पहा कीं, जो पदार्थ सर्वोपयोगी असतो

आणि ज्यावांचून सर्व लोकांला गत्यंतर नाहीं तो पदार्थ सर्वांस मिळावा ह्मणून परमेश्वरानें अत्यंत सुलभ केलेला आहे. यासाठीं तो निष्क्रयानें कमी असतो अथवा मोलावांचून मिळतो ह्मणून श्रेष्ठत्वानें उणा मानिला जाईल काय? त्याचप्रमाणें ज्या पदार्थाची सर्वकाल फारशी गरज नसते तो मौल्यानें अधिक असतो ह्मणून त्याचा अधिकार विशेष होईल काय? तस्मात्, हे सभासदहो, मौल्याला अनुलक्षून श्रेष्ठत्व असतें असें ह्मणणें अगदींच अविचाराचें आहे. आतां, याविषयीं सर्वांस अनुभव येण्याकरितां एक दोन दृष्टांतांची योजना करितों. विस्तार झाला तर होऊं द्या. परमेश्वरसत्तेनें हें उदक सर्व लोकांला मोलावांचून मिळतें व त्यावांचून क्षणमात्रही रहाण्याला कोणच शकणार नाहीं. या पदार्थास जर मौल्य असतें तर विश्वाचाच अपघात झाला असता. अशा ह्या लोकजीवनाला फुकट मिळतें ह्मणून तुच्छ मानावें काय? आणि स्रक्चंदनादि उपभोगांला मौल्य आहे ह्मणून जीवनाहून ते श्रेष्ठ होतील काय? बरें, असो. परमेश्वराचे भक्त लोकहितार्थ पृथ्वीमध्यें संचार करितात आणि भगवंताच्या परमपवित्र गुणानुवादांचें गायन आग्रहपूर्वक सर्व लोकांच्या कर्णरंध्रांत बलात्कारें भरतात, आणि त्या श्रवणेंकरून श्रोत्यांच्या सर्व पापांचा क्षय होऊन त्यांचें जन्म सफल होतें. एवढा त्या गायनापासून निरतिशय लाभ होत असतांही त्याला मौल्य कांहींच पडत नाहीं. कदाचित् एकाद्या कीर्तनीबावानें उदरार्थ हरिकीर्तन करून मौल्य जरी

घेतलें तथापि तें स्वल्पच असतें, आणि वारांगनांचें नृत्य-गायन पहाणारे व ऐकणारे जे लोक त्यांना कांहींच पुण्य नसून मौल्य अपरिमित द्यावें लागतें. ह्मणून भगवंताच्या लोकपवित्र गुणानुवादश्रवणाहून अधिक मोलाचें नृत्यगायन श्रेष्ठ होईल काय ? असो, यांत सार एवढेंच कीं, श्रेष्ठ वस्तूला मोल विशेष असतें असा नियम नाहीं, आतां देशकाल-प्रसंगानुसारें सुवर्णरत्नादि वस्तूंच्या उच्चनीचत्वाची व्यवस्था पूर्वीच्या प्रतिपादनांत झालीच आहे. याप्रकारें आपल्या प्रश्नाचें हें यथामति उत्तर सर्वांपुढें निवेदन केलें. यांत कांहीं संशय दिसेल तर झांकून ठेवूं नये. शक्य असल्यास समाधानी करीन, नाहीं तर नमस्कार हा शेवटीं आहेच.

(इतक्यांत सुवर्ण परम क्रोधायमान होऊन मोठ्या गर्वानें सभास्थानीं प्राप्त होतो.)

**सुवर्ण**—(कोपावेशानें इकडे तिकडे फिरून) अहो सभासद, आरंभीं आपण सुवर्ण व रत्न यांमध्यें श्रेष्ठत्व कोणी-कडे हा निवाडा होण्याकरितां जो प्रश्न केला, त्यावर या पंडितानें जो शब्दांचा भडिमार केला त्यापुढें अनिवार मेघाचा धारासंपातही जणु थोडाच. किती तरी बोलण्याची वृष्टी ! शेवट एवढाही विस्तार करून प्रश्नोक्त वस्तूंत श्रेष्ठत्व कोणीकडे हें मात्र याच्यानें स्थापन करवलें नाहीं. अहो, या पंडितानें असा विचार करावा होता कीं, प्रसंगानुसार एकाद्या वस्तूस जरी गुरुत्व अथवा लघुत्व प्राप्त झालें तरी तें सर्वसाधारण नव्हे. जो श्रेष्ठ पदार्थ तो श्रेष्ठच

आणि जो लघु तो लघुच. सभ्यांनो, असें पहा, चातुर्वर्ण्यांत ब्राह्मण श्रेष्ठ. तो एकाद्या नीच कामांत उपयुक्त नसला ह्मणून निकृष्ट होईल काय? थोर तो थोरच. अहो प्रयोजनास अनुलक्षून या पंडितानें जो श्रेष्ठपणा ठरविला तो निःसंशय खोटा, या ठरावांत कांहींच जीव नाहीं. आतां मौल्यावर श्रेष्ठत्वाचा ठराव नाहीं असें जें या पंडितानें प्रतिपादन केलें हा मात्र याचा सिद्धांत खरा आहे. कारण एकादा योग्य पदार्थ मौल्यानें कमी असतो आणि एकादा निकृष्टही पदार्थ मोलानें विशेष असतो. यासाठीं श्रेष्ठत्व मौल्याला अवलंबून असतें असा नियम नाहीं. जो खरा पदार्थ असेल तो खराच ह्मटला पाहिजे, नाहीं तर बोलणारा अपराधी होतो. परंतु सुवर्ण आणि रत्न यांमध्यें सुवर्णाचा अधिकार विशेष असें स्पष्ट ह्मणण्याला या पंडितास जो संकोच वाटला हा याचा शुद्ध वेडेपणा आहे. सभासदहो, या संदिग्ध भाषणानें माझ्या हृदयांत जो त्वेष आला तो अद्यापि शांत होत नाहीं. काय सांगूं, ज्यास वस्तूच्या गुणदोषांचें ज्ञान नाहीं त्यानें पंडित कां ह्मणून घ्यावें? अरे, मी सुवर्णपदार्थ ज्या ठिकाणीं वास करितों त्या ठिकाणीं हे सर्व रत्नादिपदार्थ सहज ओढून येतात. या प्रसिद्धीचा अनुभव या नामधारक पंडितालाही असावाच. कारण माझ्या व्याप्तीचा संभव पाहून याच्यासारखे सहस्रावधि पंडित उड्या मारीत हातभर जिव्हा बाहेर काढून लाळ घोटीत एकावर एक येऊन पडतात 'वयोवृद्धास्तपो-

**वृद्धा ज्ञानवृद्धास्तथाऽपरे । ते सर्वे धनवृद्धस्य द्वारि तिष्ठंति किंकराः'** असो, असा हा अनुभव नित्य असतां या कृत्रिमपंडितानें अगदींच डोळे झांकले यावरून मोठेंच आश्चर्य वाटतें.

( इतक्यांत मोठ्या त्वेषानें छाती पिटून दांत ओठ खात होत्साती मुक्ता सभेंत प्राप्त होते. )

( सर्व तटस्थ पाहतात. )

**मुक्ता**—सभ्यहो, ऐकिलेंना या दुर्विनीत सुवर्णाचें सगर्व भाषण? अर्थगांभीर्य नसतां मोठ्यानें ओरडून अपरिमित भाषण केलें ह्मणून काय तें शोभत असतें? भाषण मितच असावें, परंतु तें विचारगंभीर असावें. विचार ह्मणजे सर्वांचा मायबाप आहे. जो विचारानें वागतो त्याला सर्व संपत्ति आपोआप येऊन वरतात आणि ज्यानें विचाराचा तिरस्कार केला त्याच्या स्वयमेव विपत्ति येऊन गळ्यास पडतात. तेव्हां विचाराला सोडून कोणाचाच बचाव होणार नाहीं याविषयीं एका नीतिज्ञाचा उपदेश आहे.

'सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् ।
वृणते हि विमृश्यकारिणं गुणलुब्धाः स्वयमेव संपदः'

असें विचाराच्या ठायीं महत्त्व आहे. परंतु या सुवर्णाच्या ठिकाणीं त्या विचारसूर्याला अविचारराहूनें ग्रासून टाकिलें आहे. त्या गरीबाचें नांव सुद्धां राहिलें नाहीं. खऱ्या ग्रहणाला ग्रासमोक्षांचा कालनियम तरी असतो. हें तर नित्यग्रहण. सभ्यहो, जर या सुवर्णाला विचार असता तर आपली योग्यता कोणीकडे आणि अनर्घ्य रत्नाचा अधिकार

कोणीकडे हा समज लागलाच याच्या अंतःकरणांत येऊन चुकला असता. 'इंद्राचा ऐरावत कुठें आणि शामभटाचा तट्टु कुठें' हायहाय! केवढा तरी वेडेपणा हा!

**सुवर्ण**–( सक्रोध होऊन आपल्याशीं ) हा रंडे, दुष्टे, निर्लज्जे, मी अविचारी आणि तूं मोठी विचारवती काय? ( सभ्यांकडे ) अहो सभासद, ही अधमा या धातुराजाशीं स्पर्धा वागविते ही कोणाची कोण आहे? या वराकीनें माझी योग्यता अद्यापि जाणलीच नाहीं वाटतें:—

श्लोक ( शिखरिणी. ).

सुता कोणाची हे कतमकुलिं[1] उत्पत्ति वनिता
असे कोणाची ही सुजनिं अतिधृष्टा[2] न उचिता ।
न जाणे मातें ज्या स्तवुनि जन आराधिति मुखें
इह स्वर्गीही त्यां सुलभचि असाधारण सुखें ॥ १ ॥

श्लोक ( शार्दूलविक्रीडित. ).

जेथें मी वसतों विशंक वसती तेथें सुशास्त्रें सदा
वाजी वारण वस्त्र शस्त्र कुसुमें पात्रें मही सौख्यदा ।
नानादेशगसुज्ञपंडित कृती येती गृहा कौतुकें
होती तृप्तहि दत्तवित्तवसनें सद्भक्ष्यभोज्यादिकें ॥ ९ ॥

सभ्यहो, एवंच मी सर्वांना मान्य व संपूर्ण वस्तु माझ्या आश्रयानेंच वसतात हें तर प्रसिद्धच आहे. आतां माझ्याठायीं उत्तम लोक देणारे धर्म कसे वसतात तें ऐका:—

---

१ कोणत्या कुलाच्या ठायीं. २ दांडगी.

आर्या( गीति. ).

यद्देहीं वसतों मी सकृपत्वें तोचि या जगीं धन्य ।
वापीकूपतडागाऽऽदिसुधर्मे होय लोकमूर्धन्य ॥ ६ ॥
सोमाश्वमेधयागहि दानेंहि तुलादि जीं न वर्णवती ।
एवं सुधर्मसंहति लोकीं जी सर्व ती सुवर्णवती ॥७॥

हे दुष्टे, आतां तरी या सुवर्णाची ओळख पटली काय? हे गर्ववति, अद्यापि तरी शुद्धीवर येः—

आर्या ( गीति. ).

या हेमकेसरिपुढें भुंकसि मुक्तार्गला जसी कुतरी ।
इच्छुनि तरावया या सिंधूतें तूं न लाजसी कुंतरी ॥८॥

**मुक्ता**—(हास्य करून) वः! किती तरी आत्मस्तुति! या गर्वानें इकडे तिकडे मुरकतांना मान आणखी मोडेल ह्मणून पंचाईत! अरे आत्मश्लाघिन्, सुवर्णा, तुझी गर्वोक्ति ऐकून मला फारच हसें आलें. गुणाचें वर्णन ह्मटलें असतां दुसऱ्यानें करावें ह्मणजे तें फारच शोभत असतें, परंतु आपल्या गुणांची स्तुति आपणच जर केली तर इंद्रही लघुत्वाला प्राप्त होईल हें तूं कसें समजत नाहींस? नीतिशास्त्र असें आहे; 'परेषां गुणसंवादे वावदूकाः स्ववर्णने । मूकास्ते साधवः ख्याता विपरीतास्तु दुर्जनाः' या वाक्याचें विवेचन करून पहा ह्मणजे आत्मस्तुति करून किती योग्यता मिळते हें सहजच समजेल.

---

१ लोकांमध्यें श्रेष्ठ. २ तुलापुरुषादि. ३ समूह. ४ सुवर्णापासून झालेली. ५ सुवर्ण हाच सिंह. ६ प्रतिबंधरहित. ७ फुटकी नौका.

(सभ्यांकडेस) सभ्यांनो, गर्वपर्वताच्या उच्चशिखरावर आरोहण करणाऱ्या या मूढ सुवर्णाची ऐकिली का अभिमानोक्ति? आपण केसरी आणि मी मुक्ता त्यापुढें कुतरी! तसाच आपण गंभीरसागर आणि त्यांत बुडणारी मी फुटकी नौका! काय उन्माद हा! यावरून याच्या पुढें उभी राहण्याची सुद्धां माझी योग्यता नाहीं. अहो सभ्य, या नपुंसकाला एवढा थोरपणा तरी कोठून आला? सुवर्णाचीं ह्मटलीं ह्मणजे एकंदर नांवें नपुंसकलिंगी आहेत. त्यांत एक सुद्धां शुद्ध पुल्लिंग नाहीं, आणि मोठ्या कवीश्वरांनींही याला सर्वतः नपुंसकच मानिलें आहे. खरेंना पंडितराव? याला निषिद्धलिंग ह्मणतातः परंतु त्याविषयींची लज्जा याला मुळींच नाहीं. आतां माझ्यावर एक प्रसंग परमकठिण आलेला आहे त्याचें कसें करूं?

**सभ्य**—तो कोणताग प्रसंग?

**मुक्ता**—माझें कोणत्या कुळीं जन्म आणि मी कोणाची कोण हें सांगण्याविषयीं या सुवर्णानें आपल्या समक्षच सूचना दिलीना? यास्तव माझें एकंदर कुलशीलवर्णन करावेंच लागेल आणि त्यांत आत्मस्तुति होणारच. मग या विद्वज्जनसभेंत हें मला किती लाजिरवाणें आहे बरें? परंतु काय करूं, नीचाशीं प्रसंग पडला ह्मणजे कुठचा मान आणि कुठची लज्जा? 'अहो दुर्जनसंसर्गान्मानहानिः पदे पदे। पावको लोहसंसर्गान्मुद्गरेण विहन्यते' विद्वज्जन हो, सुवर्णानें जी सांप्रतकालीं आत्मस्तुती केली तीस म्यां तुमच्या

समक्ष दूषण लाविलें, आणि आतां माझ्याही साहजिक कुल-शीलवर्णनांत त्यांतील कांहीं अंतर्भाव होईलच; परंतु हें बुद्धि-पूर्वक नव्हे हा मात्र भेद लक्षांत असूंद्या; आणि या माझ्या कुलसंबंधादिकथनाकडेस जरासें लक्ष द्या. ह्मणजे झालें:—

श्लोक ( शिखरिणी. )

पिता माझा रत्नाकर[1] जननि रत्नोदेरि[2] असे
विधु भ्राता जो श्रीपशुपतिशिरीं नित्य विलसे।
स्वसा[3] पद्मा[4] ते श्रीहरिहृदयपद्मैकनिलया[5]
दुजा बंधू तो तद्गलग[6] ह्मणती कौस्तुभ जया ॥९॥

श्लोक ( उपेंद्रवज्रा. )

दोषव्रजें संतत मी विमुक्ता[7]
ह्मणोनि माझें अभिधान मुक्ता।
मातें सदा प्रार्थिति राजरामा[8]
वक्षोजभूषार्थ[9] मनोभिरामा ॥ १० ॥

आर्या ( गीति. )

असती जे क्षितिपृष्ठीं सुगुणी धर्मार्थ धनंजिहासु[10] कृती[11]।
ते मत्पति जे वाहति कंठीं कर्णीं मला महासुकृती ११

१ समुद्र. २ शिंपी. ३ बहीण. ४ लक्ष्मी. ५ श्रीहरीचें हृदय-कमल हेंच मुख्य गृह जीचें अशी. ६ त्या श्रीहरीच्या गळ्यांत रहाणारा. ७ रहिता. ८ राजांच्या स्त्रिया. ९ स्तनास भूषण करण्यासाठीं. १० धनाचा त्याग करण्याची इच्छा करणारे. ११ कुशल.

आर्या ( गीति. )

**या सद्गुणसद्मातें[1]**
**निंदी हें क्लीबें[2] हेमें[3] निर्लेप[4] हाँ[5] ।**
**हें ज्या प्रिय तो क्लीबचि**
**बुध बुधहो ज्योतिषाख्य शास्त्र पहा ॥ १२ ॥**

विद्वज्जनहो, पहा हें सुवर्ण नपुंसकच, आणि तें ज्या बुधग्रहाला प्रिय तो बुधही ज्योतिःशास्त्रकर्त्यांनीं नपुंसकच्च मानिला आहे, नाहीं बरें?

**पंडित**—होय, होय, या सुवर्णाचीं एकंदर नामें नपुंसकलिंगी आहेत खरीं, आणि हें बुधाला प्रिय असून तो बुधही नपुंसकलिंगी आहे खरा. याविषयीं ज्योतिःशास्त्रांत बहुत प्रमाणें आढळतात, '**बुधसूर्यसुतौ नपुंसकाख्यौ**' तथा '**ज्ञस्य मुदे सुवर्णम्**' ।

**मुक्ता**—हाँ, याचकरतां हें नपुंसक सुवर्ण त्याला आवडलें '**सर्वोऽपि सगंधेषु स्निह्यति जंतुः**' समत्व असल्यावांचून मैत्री जडणारच नाहीं.

**सुवर्ण**— सभ्यहो, तुह्मी सारासार विचार जाणणारे आहां. याकरतां खरेंच सांगा कीं, ही दुष्टहृदया मुक्ता सर्वोत्तम अशा या सुवर्णाप्रत नपुंसक ह्मणते हें यथार्थ आहे काय? मला वाटतें कीं ही मुळींच शुद्धीवर नाहीं. जर ही शुद्धीवर असती तर या लोकांत इतस्ततः पसरणारी माझी संतती प्रसिद्ध असतां मला हिनें नपुंसक ह्मटलें नसतें. मला

१ सद्गुणाचें घर अशातें. २ नपुंसक. ३ सुवर्ण. ४ निर्लज्ज ५ हाय.

वाटतें या वराकीला मुक्ता असें नांव बऱ्याच कोणी शाहाण्यानें अन्वर्थक ठेविलें आहे. कारण ही लोकलज्जेपासून मुक्तच झालेली आहे:—

श्लोक. ( द्रुतविलंबित. )

मुकुट कुंडल कंठविभूषणें
कटक किंकिणिका करकंकणें ।
पदक बाहुविभूषण मुद्रिका
सुमुखरा[1] कटिभूषण कांचिका[2] ॥ १३ ॥

आर्या ( गीति. )

ऐसी मत्संतति हे क्लीबत्वभ्रमहरा असामान्य[3] ।
त्या बुधखेटाचा ही पुरूरवा सुत नसे असा मान्य ॥१४॥

बुधहो, याप्रमाणें माझी ही कटककुंडलादिक संतती सर्वलोकांत प्रसिद्धच आहे. त्याचप्रमाणें माझ्यावर निरंतर प्रीति ठेवणारा जो बुध ग्रह त्याचा पुरूरवा नांवाचा पुत्र प्रसिद्ध असून त्याच्या संततीचा यशःपट अद्यापि दिक्कामिनींला अंगावरण करितो. असें असून ही गतलज्जा मुक्त। आमच्या ठायीं क्लीबत्वाचा आरोप करिते, या मूढेला ह्मणावें तरी काय? मला वाटतें कीं या शतमूर्खेला उपदेश करून शहाणी करण्यास बृहस्पती जरी आला तथापि तोही विफलप्रयास होईल. मग त्या ठिकाणीं आमच्यासारख्यांची कथाच नको. याचें कारण 'अंतःसारविहीनानामुपदेशो न विद्यते । मलयाचलसंसर्गान्न वेणुश्चंदनायते' ह्मणजे

१ शब्द करणारी. २ मेखला. ३ तुलनारहित.

अंतःसार ज्या वस्तूंला नाहीं त्यांला उपदेशाचेंही प्रयोजन नाहीं, कारण तो उपदेश त्या ठिकाणीं लागूच होत नाहीं. याविषयीं निदर्शन : मलयाचलाच्या सहवासानें जवळ असलेले वृक्ष चंदनरूप होतात; परंतु जे ससार आहेत त्यांनांच तो विकार होतो आणि त्यांहून निकटवर्ती असणाऱ्याही कीचकादि वृक्षांस निःसारत्वामुळें त्या मलयसंबंधी सुवासाचा संपर्क सुद्धां प्राप्त होत नाहीं. तस्मात् ही मुक्ताही निःसारच आहे, यास्तव या ठिकाणींही उपदेश करण्याचा प्रयत्न हस्तिस्नानासारखा निष्फलच आहे. सभ्यांनो, ही अविचारिणी मुक्ता या सकलवस्तूत्तम सुवर्णाप्रत जर नपुंसक ह्मणते तर ही रंडा त्या जगदुत्पादक परब्रह्मवस्तूलाही क्लीब ह्मणण्यास मागें सरणार नाहीं. अहो, ज्या परब्रह्मापासून मूलप्रकृति, तीपासून महत्तत्त्व, आणी त्यापासून त्रिविध अहंकार आणि त्या अहंकारापासून मात्रा, पंचभूतें, दशेंद्रियें, व अंतःकरणचतुष्टय इत्यादि तत्त्वें उत्पन्न होऊन सृष्टीचा क्रम चालू झाला, तें ब्रह्म नाममात्रानें नपुंसक होईल काय? असो, आणखी उदाहरणें पहा : हा दारशब्द पुल्लिंग आहे ह्मणून त्या शब्दानें वाच्य ज्या स्त्रिया त्या पुल्लिंग होतील काय? त्याचप्रमाणें देवताशब्द स्त्रीलिंग, आणि दैवत शब्द नपुंसक, ह्मणून तद्वाच्य जे विष्णुरुद्रादि देव ते स्त्रीलिंग किंवा नपुंसक होतील काय? बरें, सभ्यांनो तुह्मी वराकीला आमच्या नपुंसकत्वाच्या खरेपणाविषयीं पूर्वी अनुमोदन दिलें आणि पश्चात् या अविचारिणीचीं अनन्वित

भाषणें ऐकून काहींच उत्तर करित नाहींत, यावरून मला वाटतें कीं तुह्मी या गणिकेचे पक्षपातीच आहांत. छिः, हें तुह्मांला योग्य आहे काय? हा पक्षपात सभ्यांस ह्मटला ह्मणजे मोठाच कलंकास्पद आहे. अहो, सभा ह्मणजे अर्थ काय आहे हा तरी आपण विचार केला काय? नाहीं वाटतें. आतां मी तरी सांगतोंः

"भा प्रकाशः तया सह वर्तत इति सभा" या ठिकाणीं प्रकाश ह्मटला ह्मणजे धर्मास अनुसरून वागणाऱ्या विद्वानांचाच घ्यावा. त्यांची जी संहति ती सभा. सभेची योग्यता अशी आहे 'यस्मिन्देशे निषीदंति विप्रा वेदविदस्त्रयः। राज्ञश्चाधिकृतो विद्वान् ब्रह्मणस्तां सभां विदुः' अशा ब्राह्मीतुल्य सभेंत जो असत्याभिमानजन्य अधर्म उत्पन्न होतो तेणेंकरून सत्याभिमानजन्य धर्म अत्यंत पीडित होतो. त्या धर्मपीडाकर अधर्मरूप शल्याचा सभासदांनीं उद्धार करावा. जर ते करित नाहींत, तर ते त्याच अधर्मशल्यानें विद्ध होतात. तथाच धर्मशास्त्रम्ः– 'धर्मो विद्धस्त्वधर्मेण सभा यत्रोपतिष्ठते। शल्यं चास्य न कृंतंति विद्धास्तत्र सभासदः' असे सभ्यांच्या मस्तकावर महान् दोष आहेत, यास्तव 'सभां वा न प्रवेष्टव्यं वक्तव्यं वा समंजसम्। अब्रुवन् विब्रुवन् वापि नरो भवति किल्बिषी' जो शहाणा आहे त्याणें या सभ्यदोषाच्या महाभयास्तव सभेंत मुळींच पाय ठेवूं नये, आणि ठेविला तर पक्षपात सोडून यथार्थ असेल तेंच बोलावें आणि तें सोडून सत्यविरुद्ध बोलणारा किंवा निः-

शब्द रहाणारा उभयतः पापी होतो. ज्या सभेंत असत्यानें सत्य बाधित होतें आणि अधर्मानें धर्म हन्यमान होतो त्या ठिकाणीं प्रतीकार न करणारे सभासद त्या महापापानें हत होतात 'यत्राऽधर्मो ह्यधर्मेण सत्यं यत्राऽनृतेन च। हन्यते प्रेक्षमाणानां हतास्तत्र सभासदः' यास्तव सभासदांला क्षणोक्षणीं महादोष प्राप्त होतात. ह्मणून सभ्यांनीं फार जपून धर्माचें रक्षण केलें तरच तो आपलें रक्षण करितो आणि जर त्याचा क्षय केला तर तो आपलाही क्षय करीत असतो. हे सभ्यांनो, आपण तर त्या धर्माकडेस पाठच केली आहे. मग कसें बरें तुमचें कल्याण होईल? पहा, जसें राजदंडाचें भय तसें सर्वांनीं धर्माचें भय धरिलें पाहिजे. जर धर्माचें भय नाहीं तर राजदंडाचेंही भय नाहीं. असें झालें तर हें मोठेंच साहस. अहो, धर्माचें भय सोडलें तर कोणत्या तरी स्थळीं सौख्य मिळेल काय? 'रागाल्लोभाद्भयाद्वापि स्मृत्यपेतादिकारिणः। न सुखं विद्यते तस्य इह लोके परत्र च' असें धर्मशास्त्र असून, सभ्यहो, धर्मास प्रतिपक्षी होऊन तुह्मीं ह्या असत्यवादिनी मुक्तेचा पक्षपात धरिला यावरून तुह्मांला ह्मणावें तरी काय? माझ्यानें तुह्मांला विशेष सांगवत नाहीं, परंतु एवढें तरी करा 'सभ्याः पृथक् पृथक् दंड्या विवादाद्द्विगुणं दमम्' या वाक्याचा भावार्थ मनांत आणून व्यवहार करा ह्मणजे झालें.

**सभ्य**–दंड होऊं द्या, दंडाला कोण भितो? परंतु आह्मी मुक्तेचाच पक्षपात कां धरूं?

**सुवर्ण**—काय ह्मणतां? मुक्तेचाच पक्षपात कां धरूं? सांगतों कां धरलात तो. मुक्ता ही रूपानें सुरेख असून अवयवांनींही चांगली वाटोळी गुळगुळीत आहे. मग तिच्यावर कोणाचा डोळा नसेल? आतां विचार केला असतां या पदार्थांत तत्त्व कांहींच नाहीं. ही वस्तु निःसारच आहे. परंतु सारासारविचार करतो कोण, पहाणारे बाहेरचाच रंग पहातात. एका कवीनें ह्मटलें आहे '**नांतस्तत्त्वविचारणप्रणयिनो लोका बहिर्बुद्धयः**' वाहवा! मोलच नाहीं या कवीच्या भाषणाला.

**सभ्य**— ( हास्य करून ) छिः, काय भाषण हें आह्मांला कोणाचाच पक्षपात नाहीं, परंतु सर्वच कवि प्रतिस्थलीं नपुंसकत्वानें तुझा निर्देश करितात ह्मणून सहज ह्मटलें हें कांहीं मुक्तेच्या पक्षानें ह्मटलें असें नाहीं.

**सुवर्ण**—(उपहासयुक्त होऊन) हाय! हाय! तुह्मीही त्या उच्छृंखल कवींचीं वचनें प्रमाण मानितां काय? कवींचा स्वभाव अद्यापि तुह्मीं समजलां नाहीं '**कवयः किं न भाषंते किं न जल्पंति मद्यपाः । राजानः किं न कुर्वंति किं न भक्षंति वायसाः**' कवि श्लेषचमत्कारादिवर्णनार्थ भलतेंच बोलत असतात. पहा, ह्या चंद्राच्या कलंकावर निरानिराळ्या कवींनीं निरनिरळ्या उत्प्रेक्षा घेतल्या आहेत. परंतु विचारदृष्टीनें पाहिलें तर त्यांतील एक तरी उत्प्रेक्षा यथार्थ आहे काय? आतां हें एक चंद्राच्या कलंकाविषयीं उपलक्षण सां-

गितलें. याचप्रमाणें कवींनीं नानाविध पदार्थांच्या ठायीं अनेक वितर्क आरोपित केलेले आहेत. ते सर्वच यथार्थ मानिले तर मोठीच अनवस्था होईल. यास्तव कवींच्या भाषणावर कोणींच विश्वास ठेवूं नये. कवि आपणास इष्ट जो अर्थ त्याच्या सिध्यर्थ भलतेंच बरळत असतात. तसेंच मद्यपान करणारेही त्या मद्यमदानें अनर्गलच बोलत असतात ह्मणून तें कोणीच यथार्थ मानीत नाहींत, त्याचप्रमाणें राजेही राजसत्तेच्या बलानें भलतेंच कर्म करीत असतात. तेंच यथान्याय मानून इतरानें ग्रहण करावें असें नाहीं. तसेंच वायसही आपल्या जातिस्वभावामुळें कोणताही अभक्ष्य पदार्थ भक्षण करितात. त्यांना टाकण्याजोगा ह्मणून पदार्थच नाहीं. याप्रकारें कवींचीं भाषणें तत्तुल्य कवींनींच अयथार्थ मानिलीं आहेत. यासाठीं खरेपणाच्या पक्षांत तादृश वचनाचें कोणींच ग्रहण करूं नये. अस्तु, कर्णहीनाकडेस सुस्वर गायन करून श्रमाशिवाय दुसरें काय मिळणार आहे? यास्तव पुरे हा असत्कलह. **'मौनं सर्वार्थसाधनं'** ह्मणून उगीच रहावें हें चांगलें.

**मुक्ता**—(गर्वानें इकडे तिकडे फिरून) हे दुर्वादिन् हाटका, तुला मी या वेळीं काय सागूं? हे मूढमते, तूं सर्व लज्जेचा तिरस्कार करून या कुलवतीशीं स्पर्धा धारण करण्यास आरंभ केलास! तर पूर्वी तुझ्या उत्पत्तिस्थानाचा विचार कर ह्मणजे तुझी योग्यता तुलाच समजेल:—

आर्या (गीति.)

**मी रत्नाकरजा[1] तुज मत्समता आकरोद्भवा[2] नीचा ।**
**साजे न जशी करभा[3] सिंहाची योग्यता भवानीचा ॥१९॥**

हे दुर्मते, कनका, रत्नाकरापासून माझी उत्पत्ती आणि तुझी भूमीच्या आकरापासून हें तुला समजलें असून माझ्याशीं समता धारण करण्यास लज्जा कशी वाटत नाहीं? परंतु तुला जडाला लज्जा तरी कोठून असेल? जसें कारण तसें कार्य. बहुधा सर्व ठिकाणीं हीच परंपरा दिसून येते. याविषयीं प्रमाणेंही बहुत आहेत. '**कारणेन समं कार्यमिति सत्यवती श्रुतिः । पंचाननेनैकमुख्याः संगाज्जातो हि षण्मुखः**' ह्मणजे पांच मुखांचा महादेव आणि एक मुखाची पार्वती ह्या दोघांच्या समागमानें अपत्य सहामुखांचें उत्पन्न झालें. तस्मात् कारणासारखें कार्य उत्पन्न होतें ही श्रुती यथार्थ आहे, मिथ्याभूतच पंचपर्वा अविद्येपासून हा प्रपंचही मिथ्याभूतच झाला. एवंच कार्याची कारणांशीं समता असते असें जें मी पूर्वींपासून ऐकत होतें तें आज माझ्या प्रत्ययाला आलें. (सभासदांकडे फिरून) कायहो, सभासद, ह्या कनकाची उत्पत्ती भूमीच्या आकरापासून आहेना? आणि जडमृत्तिका हें याचें भावंडना? मग ह्या रत्नाकरोत्पन्न मुक्तेशीं कलह करणें हें आपल्याला युक्त नव्हे हें ह्या जडाला कसें हो समजेल? माझ्या मतें या कनकाचा अपराध यांत

१ समुद्रा पासून उत्पन्न झालेली. २ मातीच्या खाणीपासून उत्पन्न झालेल्या. ३ उंटाला.

कांहींच नाहीं हा त्या आकरापासून प्राप्त झालेल्या जड-त्वाचा दोष आहे.

**सुवर्ण**–( उपहासयुक्त होऊन आपल्याशीं ) काय ह्या अधम मुक्तेचा उन्माद हा! अरे, ही दुष्टा मी भूमीच्या आ-करापासून झालों ह्मणून माझ्याकडेस दोषाचा आरोप करिते आणि आपल्या दोषांकडेस ढुंकून सुद्धां पहात नाहीं हें मोठेंच आश्चर्य नव्हे काय? अथवा आश्चर्य तरी कसचें? खलस्व-भाव या रीतीचाच असतो. खल ह्मटले ह्मणजे परापवा-दांच्या वर्णनाविषयीं वाचस्पती किंवा सहस्रवदन होतात, आणि आपल्या दोषांकडेस पाहून अगदींच मुके होतात, त-सेंच परांच्या छिद्रान्वेषणाविषयीं त्यांनां सहस्राक्षाची योग्यता प्राप्त होते आणि आपल्या दोषांकडेस बिचाऱ्यांचे अग-दींच डोळे फुटतात. स्वतांचे दोष जरी पर्वताएवढे असले तथापि ते त्यांच्या डोळ्यांतच जात नाहींत आणि पराचे दोष स्वल्प जरी असले तथापि ते मात्र लागलेच डोळ्यांत भर-तात. याविषयीं एका प्राचीन कवीची उक्ती आहे: '**खलः सर्षपमात्राणि परच्छिद्राणि पश्यति। आत्मनो बिल्वमा-त्राणि पश्यन्नपि न पश्यति**' याकरितां खलस्वभाव हा मोठा विलक्षण आहे. (मुक्तेकडेस वळून) हे दुष्टे, हे स्वदोषाच्छादके परदोषसंवादिनी मुक्ते, अन्याच्या डोळ्यांतील कुसळ तुला चागलें दिसतें आणि तुझ्याच डोळ्यांत असणारें मुसळ तुला दिसत नाहीं काय? तर आतां डोळे फाडून पहा:—

श्लोक ( चंपकमाला. )

तूं जड[1]राशीपासुनि दुष्टे जन्मुनि मातें हांससि नष्टे ।
हे झष[2] आणी नक्र हि सारे बांधव तूझे जाण असारे ॥१६॥

श्लोक ( विद्युन्माला. )

ऐसी तूं दोषांची माला लावायाला अन्या बोला ।
लज्जा तूतें ज्ञानभ्रष्टे नाहीं कैसी गे पापिष्ठे ॥ १७ ॥

हे निर्लज्जे, तूं जडापासून उत्पन्न झालीस ह्मणून तुझ्याठायीं हें जाड्य वसतें आणि याचकरितां तुझ्यामध्यें युक्तायुक्तविचाराचा लेश देखील नाहीं, हे अविचारिणी, मी निर्दोष असतां माझ्यावर तूं जनकदोष आरोपित केलास; परंतु सर्व ठिकाणींच कारणानुरूप कार्य होण्याचा नियम आहे काय? हे मूढे, कोणत्या तरी जागीं अंधापासून अंध, काण्यापासून काणा, पंगूपासून पंगू, विद्वानापासून विद्वान्, आणि मूर्खापासून मूर्ख, नियमानें उत्पन्न झालेला पाहिला आहेस काय? आतां एखाद्या ठिकाणीं कार्यकारणाचें साम्य होतें, परंतु त्यास नियम ह्मणतां येणार नाहीं. वास्तविक ह्मटलें ह्मणजे सर्व पदार्थांस महत्त्व आणि लघुत्व आपल्याच गुणांनीं प्राप्त होतें. याविषयीं शतशः उदाहरणें मिळतील:—

श्लोक ( इंद्रवज्रा. )

कौशेय[3]वस्त्रें कृमिकोश[4]जन्यें
होती तथापि स्वगुणेंच मान्यें ।

---

१ डकारलकारांस सावर्ण्य आहे यास्तव जडराशी ह्मणजे जलराशी. २ मत्स्य. ३ रेशमी. ४ कीटकाच्या कोठ्यापासून उत्पन्न.

इंदीवरोत्पत्तिहि[1] गोमयानें
सन्मान्यता त्या स्वगुणोदयानें ॥ १८ ॥

श्लोक ( अनुष्टुप् )

जंबालापासुनी[2] जन्मा येती तामरसें[3] सदा ।
तथापि तीं स्वीयगुणें सर्व लोकांसि तर्पिती[4] ॥ १९ ॥

श्लोक ( उपेंद्रवज्रा· )

समुद्रजन्मा परि चंद्र लोकीं
गुणें जनां तो सुखवी विलोकीं ।
प्रमोद गोपित्तज[5] रोचनानें
जनासि पाहें निजलोचनानें ॥ २० ॥

श्लोक ( शार्दूलविक्रीडित· )

काष्ठापासुनि जन्म ज्या द्विज सदा त्या वन्हिला तर्पिती
इष्टार्थाप्ति[6] मनीं धरूनि सुहविर्द्रव्यें तया अर्पिती ।
सूर्यास्तोद्गमकाल[7] साधुनि मुनी ज्या प्रार्थिती प्रश्रयें[8]
अंतीं स्वर्गपदासि लाधति सुखें त्याच्याचि ते आश्रयें २१

श्लोक ( वसंततिलका· )

गोरोमजा[9] परि गजास्यशिरीं[10] विराजे
दूर्वा गुणैकततिं[11] मानिति जीस राजे ।

---

१ कृष्णकमलें　२ चिखलापासून·　३ रक्तकमलें·　४ सुखविती· ५ गाईच्या पित्तापासून झालेल्या· ६ इच्छित अर्थाची प्राप्ति· ७ सूर्याचा अस्तोदयकाल· ८ विनयें· ९ गाईच्या रोमापासून झालेली· १० गणपति· ११ गुणांचा समूह·

दुष्टाहि[1]मूर्धभवसन्मणि तोहि धन्य
झाला निजें गुणगणें जगतींत मान्य ॥ २२ ॥

एवंच गुणवत्पदार्थांचा उत्कर्ष आपल्याच गुणानें होतो. पहा, मुक्ते, या वर्णितपदार्थांच्या अंगीं जे महागुण आहेत त्यांतील एक तरी त्यांच्या उत्पत्तिस्थानाच्याठायीं आहे काय? बरें, त्या उत्पत्तिस्थानाचा तरी एकादा अवगुण या गुणवद्वस्तूंमध्यें दिसतो काय? तस्मात् गुणवान् आपल्याच गुणोदयेंकरून जगतींत मान्य होतात यांत संशय नाहीं. 'प्राकाश्यं स्वगुणैरेव गुणिनां भवति ध्रुवम् । किं तातेन जनन्या वा कुलेन विमलेन वा' असो. हे विरुद्धप्रलापिनी मुक्ते, भाषणाचा विस्तार तर फारच झाला परंतु एवढ्यानेंच तुझ्या मूर्खत्वाची निवृत्ती होईल असें वाटत नाहीं. यास्तव तुला खात्री पटण्याजोगें तुझ्यावरूनच एक उदाहरण सांगतों:—

श्लोक (मंदाक्रांता.)

जन्मप्रौढी विफल तुजची तें महत्त्व स्वतेजें
एकोत्पत्ती असूनि न मिळे मत्स्यकच्छ[2]ादिकांजें ।
मुग्धे[3] तस्मात् परिस हित हें या सुवर्णीं प्रयुक्ता
स्पर्धा जे त्वां प्रकृतिचपले[4] सर्वथा ते न युक्ता २३

श्लोक (मालिनी.)

जरि जनकमहत्त्वें होय पुत्रीं महत्त्व
तरि न तव शरीरीं शुक्तिका[5]जन्य तत्त्व ।

१ दुष्ट सर्पाच्या मस्तकांत उत्पन्न झालेला. २ कांसव. ३ मूर्खे. ४ स्वभावचपले. ५ शिंपीपासून झालेलें.

गुणविरहित जें कीं श्रेष्ठता त्यासि नोहे
निजहृदयिं तुझें तूं जन्म योजूनि पाहें ॥ २४ ॥

अनभिज्ञे मुक्ते, आतां तुझ्या वृत्तांतावरून तरी खात्री होईल काय? न झाली तर मग नाइलाज! मग मघांपासून माझें हें अरण्यरोदन अथवा भस्मामध्यें हवन झालें. मुक्ते, नको माझ्याशीं स्पर्धा करूं. अद्यापि तरी शहाणी हो. तूं ही पोटास कलश बांधून सागरास तरून जाण्याची इच्छा केली आहेस; परंतु ती शेवटाला जाणें फारच कठिण आहे. विचारशून्ये, अद्यापि या गुणवत्तर सुवर्णाची योग्यता जाणलीच नाहींस काय? अगे, माझ्यावांचून इंद्रादिदेवांलाही सुखानें वसती करण्यास अवकाश नाहीं; आणि हें संपूर्ण चतुर्दशभुवनात्मक विश्व उत्पन्न करण्यास मुख्य कारण मीच आहें, हें तुला अजून समजलें नाहीं काय? तर आतां तरी ऐक:—

आर्या ( गीति. )

कनकमय मेरु ऐसें
नेणसि सुर वसति करुनि असती तें ।
मद्भाग्य तुला कैंचें
साध्वीचें जेविं सुयश असतीतें[1] ॥ २५ ॥

श्लोक ( स्रग्धरा. )

जो विश्वोत्पत्तिदक्ष प्रणतजनपरित्राणकारी[2] विधाता[3]
तो पावे जन्म हैमीं[4] कमलिं ह्मणुनि गे मीच त्याचीहि माता ।

---

१ जारिणीतें. २ शरणागत जनाचें रक्षण करणारा. ३ ब्रह्मा. ४ सुवर्णापासून झालेल्या.

तो चौदा लोकही ते स्वजनककमलाच्याचि भागें करोनि
निर्मी ते मत्समज्ञा न तुज जरिहि तूं येसि जन्मा मरोनी
॥ २६ ॥

श्लोक ( इंद्रवंशा. )

ऐसीं मदंशे भुवनें समस्त हीं
उत्पादिलीं त्यांतचि एक हे मही ।
त्वत्तातही तींत पहा विचारुनी
मूढे वृथा वाहसि गर्व तूं मनीं ॥ २७ ॥

मुग्धे, यावरून मला आणखी तुला किती अंतर आहे तें तूंच पहा. अगे, माझ्यापासून जीं चतुर्दश भुवनें उत्पन्न झालीं त्यांतून एका भुवनाच्या एकदेशांत तुझा पिता समुद्र रहातोना? आणि त्यांतच तुझीही उत्पत्ती आहेना? झाला तर मग निवाडा, आतां मात्र बोलूं नको.

**मुक्ता**–( गर्वयुक्त होऊन सभ्यांकडेस ) सभ्यांनो, ऐकिलेंना? काय या कनकाचें सगर्व भाषण हें! यावरून याणें मलाच तुच्छ केली असें नाहीं. तर हें विश्वोत्पत्तीला मुख्य कारण झाल्यानें ब्रह्मदेवाहून सुद्धां वरिष्ठ झालें, नाहीं बरें? तस्मात् या मूर्खाचे दांत फुटण्याजोगें बरेंच समर्पक उत्तर सांगतें.

हे असंबद्धप्रलापिन्, हे मूढमते, सुवर्णा, माझें एक वचन ऐक. अरे, एकाद्या कार्यांत चंद्रबळ नसलें तर ओढून

१ आपणास उत्पन्न करणाऱ्या. २ माझी कीर्त. ३ माझ्या अंशानें. ४ पृथ्वी.

चंद्रबळ ह्मणून आणतात, तशी तूं तोंडानें योग्यतेस ओढून आणलीस ह्मणून ती उगीच तुला मिळेल काय ? असो, तूं जर आपली योग्यता तोंडानें वाखाणून सांगितलीस तर तुझ्याहून माझी योग्यता विशेष आहे, ती मीही तोंडानें वाखाणून सागण्यास कांहीं कमी नाहीं. ऐक तर आतां या सभासदांसमक्ष सांगतें तुला:—

आर्या ( गीति· ).

ज्यापासुनि विधि जन्मुनि
निर्मी स्थिरजंगमाहि विश्वास ।
उच्छ्वास[1] विष्णुचे जे
त्यां वेदांवरि यदीय विश्वास ॥ २८ ॥
यद्भागानें झाले
ह्मणसी भूरादि[2] ज्यांत जननिकर[3] ।
तें कनककमल ज्याच्या
नाभींतुनि होय तिमिरहानिकर ॥ २९ ॥
तो विष्णु सागराच्या
उदरीं राहे करोनियां वसती ।
भूधरतल्पासह[4] यत्-
संहननीं[5] लोकसंघ[6] हे वसती ॥ ३० ॥
तत्तनया मी सुगुणा
मातें जाणसि न त्याहि मज्जनका ।

१ श्वासवायु· २ पृथिव्यादिक चतुर्दश भुवनें· ३ जनांचा समूह· ४ शेषशय्येसह· ५ ज्या विष्णूच्या शरीरांत· ६ समुदाय·

जन काय तुला ह्मणतिल
मूढा कलहासि सोडिं रे कनका ॥ ३१ ॥

हे निर्लज्जा सुवर्णा, ऐकिलेंस का माझ्या जनकाचें महत्त्व? जो ईश्वराला सुद्धां आश्रय देणारा त्या सागराहून थोर ह्मणून कांहीं पदार्थ आहे काय? अरे, महतांचें जनन झटलें ह्मणजे केवल परहितार्थच आहे यांत संशय नाहीं. ह्या माझा जनक जो सागर याच्या निर्मल अंतःकरणरूप शुद्ध पटांत स्वपरभेद किंवा सुहृच्छत्रुभाव एतत्संबंधी कलंकाचा लेश सुद्धां नाहीं. आणि याचा थोरपणाही अनिर्वाच्य आहे. (सभ्यांकडेस वळून प्रेमभरानें) अहाहा! सभ्यांनो, काय या सागराचें महत्त्व आणि सौजन्य वर्णन करावें! अहो, त्या सज्जनाच्या उदरांत एका बाजूस शेषपर्यंकावर भगवान् कमलापती सुखानें निद्रा करित आहेत. तसेंच एका कोनांत त्याच नारायणाचे शत्रु मधुकैटभ, शंखासुर, पंचजन इत्यादि राक्षसही यथावकाश रहाताहेत. अहो, ते प्रत्यक्ष आपल्या जामाताचे हाडवैरी असून तो मत्सर मनामध्यें मुळींच न आणतां त्यांनांही आपल्याच उदरांत ज्यानें आश्रय दिला त्यासारखा सुजन या ब्रह्मसृष्टींत अन्य कोणी आहे काय? असो, ते शरणार्थी मैनाकादिक पर्वत इंद्रवज्रापासून पक्षच्छेद होईल या भयास्तव याच्याच उदरांत एका प्रदेशास राहतात. एवंच याच्या आश्रयानें हे बहुत जातींचे प्राणी रहातात हें काय मोठेंसें आश्चर्य नव्हे, परंतु प्रतिदिवसीं दुष्पूर उदराच्या पूरणार्थ सं-

ख्यारहित उदकाचें प्राशन करणारे असे आपलेच जे शत्रु वडवानल, प्रलयाग्नी इत्यादिक त्यांनांसुद्धां यानें आपल्या उदरांत आश्रय दिला या स्तुत्य कर्मेकरून हा आश्रयदाता निरुपमच झाला. परोपकारित्वाची आणि थोरपणाची तर या ठिकाणीं सीमाच झाली. अहो, आपली विपत्ती सोसून जो शत्रूचें सुद्धां पालन करणारा त्यासारखा समदृष्टी अन्य कोणी आहे काय? या सौजन्यानें तो सत्पुरुष फारच शोभून गेला. यावरून '**महतां सद्व्ययेनैव विपत्तिरपि शोभते**' या वचनासही यथार्थत्व आलें. दुसरें असें कीं सर्वोपकारी असा जो मेघ तो याच सागरांतील अल्पस्वल्प उदकाचा आपल्या मुखानें संग्रह करून मोठ्या दातृत्वाच्या आवेशानें स्नेहपूर्वक गर्जना करीत होत्साता पर्वत, शिलातलें, गिरिगर्त तसेच श्रीखंडादि श्रेष्ठवृक्ष, कुटजविभीतकादि लघुवृक्ष, उदकपूर्ण-सरिता, कृत्रिमसरोवरें, खंदक इत्यादि उच्चनीच पदार्थांचे-ठायीं समानत्वानें लोकजीवन अशा जीवनाची वृष्टि करून सर्व लोकांत स्तुत्य झाला, ह्मणून याच्या लोकोत्तर गुणाचें वर्णन करून स्थावरजंगमात्मक विश्व प्रेमानें याचीच प्रतीक्षा करितें. '**एकस्य तस्य मन्ये धन्यामभ्युन्नतिं जलधरस्य। विश्वं सशैलकाननमाननमवलोकते यस्य**' या प्रकारें या तोयदसार्वभौमानें या अवर्णनीय विश्वोपकारी व्रताचें धारण करून सर्वलोकांस जो हा प्रिय झाला हें संपूर्ण या माझ्या पित्याच्या आश्रयाचें सामर्थ्य आहे. सत्पुरुष आपल्याच गु-णांनीं शोभून इतरानांही शोभवीत असतात. तस्मात् हे

मूढबुद्धे, कनका, मी त्या सागराची तनया आहें आणि माझ्याबरोबर तूं कलह मांडलास तर हा तुला सर्वथैव दुष्परिणाम आहे आणि यापासून आपलें कल्याण होईल असें तूं समजूं नको.

**सुवर्ण**–( उपहास करून ) मुक्ते, जनकाचें वर्णन करून बरीच उतराई झालीस, शाबास! जनक अवगुणी जरी असला तथापि लेकानें त्या ठिकाणीं गुणाची कल्पना करून तोंडभर झपाट्यानें वर्णन केलें ह्मणजे तो पितृऋणापासून मुक्त होतो. कारण पिता हें अपत्यांचें दैवतच होय. यास्तव पिता जरी महापापी असला तथापि अपत्यानें त्याची निंदा करूं नये. यावरून तूं पित्याचें गुणवर्णन केलेंस हें मात्र युक्त आहे आणि या न्यायावरूनच हें शोभलें, परंतु एवढ्यानेंच वर्णनाची समाप्ति झाल्यास बरें होईल. कारण, हें असंभव्य गुणवर्णन मलाच नव्हे तर लोकांलाही आवडणार नाहीं. हे अविचारिणि, असें पहा, जर गुण चांगले आहेत तर ते आपणच प्रकाशित होतात आणि सर्व लोकांच्या मुखांतून त्यांचा आपोआप आविष्कार होतो आणि ते अवगुणांनीं दडपलेले असले ह्मणजे तुझ्याप्रमाणें आक्रोशानें कंठशोषण करून लोकांच्या कानांत बलात्कारानें भरावे लागतात **‘यदि संति गुणाः पुंसां विकसंत्येव केवलं। नहि कस्तूरिकामोदः शपथेन विभाव्यते’** कस्तूरी पक्की असली ह्मणजे सहजच ओळखतां येते, शपथ वाहून खरेपणा आणावा लागत नाहीं. मूढे, गुणाचा तसा प्रत्यय आल्यावांचून आ-

ग्रहानें लोकांस प्रमाण वाटेल काय? मुक्ते, तूं उरस्फोट होई पर्यंत आपल्या पित्याचें गुणवर्णन जरी केलेंस तथापि त्याच्याठायीं परोपकारित्वाचे गुण कितीसे वसतात हें सर्व लोकांच्या हृदयांत ठसलेलेंच आहे. कोणी एकादा मनुष्य ग्रीष्मकालीं शुष्ककंठ होऊन तृषानिवारणार्थ सागराच्या तीरावर जर आला तर त्या कृपणासून तृषिताची तृषा दूर होणें हें तर लांबच राहिलें, परंतु संतप्त झालेल्या वालुकेनें सर्वांग भाजून तो उलट मरणावस्थेला मात्र प्राप्त होईल. परंतु तोच सागराच्या महत्त्वाचा भ्रम सोडून वापिकेच्याठायीं जाईल तर त्या वापिकेच्या शीतल पद्मरजोयुक्त सुवासित जलाच्या सिंचनानें सर्व संताप दूर करून अंजलीच्या पानपात्रानें दुर्निवार तृषेचें एका क्षणांत शमन करतां येईल. तस्मात् हे मुग्धे मुक्ते, जसा द्रव्यमदांध अशा कृपणाच्या द्वारांतून याचक विमुख जातो, अथवा दुर्जनाकडेस साधु जसा विरस होतो, तद्वतच तृषाक्रांत सागराकडेस प्राप्त होऊन निराश होतो आणि लघुवापिकेचा शोध करितो, हें त्याला केवढें लज्जास्पद आहे बरें? तो खरोखर जर दाता असता तर हें अपयश त्याला मरणाहून अधिक झालें असतें. पहा, कृपण धनिकाच्या द्वारांत याचक प्राप्त झाला असतां तो त्याच वेळीं तोंड आंबट करितो आणि हा तर याचकांच्या भयानें नित्य सगळाच खारट बनलेला आहे. मग याच्या दातृत्वाचें वर्णन ह्मणून या परतें राहिलें काय? असो, हा एक मोठा अवगुण जरी त्याच्या मध्यें असला तथापि त्याचे

ठायीं अल्पस्वल्प वाखाणण्याजोगे गुण असतील, नाहीं असें मी ह्मणत नाहीं, परंतु तो गुणी असला ह्मणून त्याच्या गुणाचा तुला काय उपयोग? त्याच्या गुणांनीं तुला थोरपणा मिळेल काय? बाप बृहस्पती आणि लेकाला ओ फोडण्याचें देखील ज्ञान नाहीं, मग ती पित्याची योग्यता लेकाला काय योग्यता देणार? उलट बापाचें नांव बुडविलें ह्मणून त्याचा उपहास मात्र होईल. अग्नीपासून धूर किंवा जलापासून फेन उत्पन्न होतो ह्मणून धुरापासून अथवा फेनापासून जनकापासून होणारें कार्य स्वल्प तरी होईल काय? उलट उपद्रव मात्र होईल. यासाठीं तुला मी वारंवार सांगितलें कीं सर्व पदार्थांस स्वीय गुणानेंच महत्व प्राप्त होतें. जनकाचा बडिवार वागविणें हें शुद्ध मूर्खत्व आहे, परंतु हा माझा एकंदर उपदेश तुला मुळींच लागू झाला नाहीं यावरून हा म्यां व्यर्थच श्वानपुच्छ सरळ करण्याचा प्रयत्न केला. असो, आतां तरी शुद्धीवर येऊन तुझेच कांहीं वर्णनीय गुण असतील तर सांग. पहा, मुक्ते, मी मुळापासून जो बडिवार बोलत आहें तो केवळ माझ्याच गुणांचा आहे आणि तूं पित्याच्या गुणावर उडतेस, यावरून तूं खरीच गुणहीन आहेस. जर तूं स्वतः गुणवती असतीस तर जनकाचें ऐश्वर्य सांगणार नसतीस.

**मुक्ता**—( गर्वानें हास्य करून सभ्यांकडेस) सभासदांनो, काय सांगूं, या मतिमंद सुवर्णाकडेस भाषण करून मला मोठाच पश्चात्ताप झाला; कारण हें सर्व बधिरासमोर गायन झालें. अहो, शहाण्याच्या चित्ताचें समाधान सहज करवतें

परंतु मूर्खांची समाधानी करणें ह्मणजे ती अगदींच कोंडा कांडण्यासारखी आहे. व: ! या सुवर्णास अष्टापद असें जें नांव आहे तें कोणी शहाण्यानें विचार करून ठेविलें असावें. या नामाचा अर्थ ‘ आठ आहेत आसमंतात पाद ज्यास तें ’ असा साधारणरीत्या दिसतो. आतां वास्तविक जरी भिन्न असला तथापि तूर्त याच्या रहाटीवरून हाच अर्थ योग्य वाटतो, कारण या ठिकाणीं विचाराचा लवही नसून हें मूर्खत्वाचें भांडार आहे. अहो, पशु ह्मटले ह्मणजे चार पायांचे असतात, व हें आठ पायाचें, या वरून याकडेस दुप्पट पशुत्व वसतें. मग हें मूढत्वाचें भांडार असेलच यांत संशय नाहीं. असो, आतां या मूढ सुवर्णाकडेस एकच विचारतें. हे जडमते, कनका, आपण गुणवान् आणि मी गुणहीन असें जें वारंवार बरळतेंस याचा विचार तरी केलास काय ?

श्लोक ( द्रुतविलंबित. )

ह्मणसि आपण तूं गुणवत्तर[१]
असुनियां गुणहीन निरंतर ।
सतत मी गुणयुक्तचि[२] निश्चयें
परि मला ह्मणसी अगुणा स्वयें ॥ ३१ ॥

श्लोक ( पृथ्वी. )

मदीयगुलिकासमुद्ग्रथिततारहारें[३] पहा
सुकांति मिरवे प्रियाकुचतटीं[४] विलासावहा[५] ।

---

१ अतिगुणवान्. २ अर्थांतरानें गुण ह्मणजे सूत्र तेणें युक्त. ३ माझ्या गुलिकांनीं गुंफिलेल्या तारहारें करून. ४ रमणी. ५. विलास देणारी.

सुमौक्तिकज अच्छ[1]गुच्छ गलनासिकामस्तकें
सदैव करिती अलंकृत समर्पितां हस्तकें ॥ ३२ ॥

श्लोक ( स्रग्धरा. )

ऐसी मज्[2]जन्यभूषा सतत नियतिमच्छ्लो[3]कसंघा स्वभेनें[4]
आलिंगोनि स्वभोगें सुखवि जसि शरच्चंद्रिका स्वप्रभेनें ।
मद्योगें नेत्ररम्या नरवरयु[5]वती शोभवूनि स्वगात्रें
कांताला अप्रयासें वश करिति गजा जेवि यं[6]ता स्वतो[7]त्रें
॥ ३२ ॥

श्लोक ( रथोद्धता. )

जेथ शोभति मदीय भूषणें
तेथ लाविति तुलाचि दूषणें ।
सुज्ञ पाहुनि मदीयगुच्छका
मानितील तुजला न तुच्छ कां ॥ ३४ ॥

श्लोक ( भुजंगप्रयात. )

असे जेथ मद्व्याप्ति[8] तेथें विचारी
तुला कोण मूढा असे जो विचारी ।
रसज्ञा[9] न तूझे अलंकार मान्य
जसे दारँ[10] नाराय[11]णाला रमान्य[12] ॥ ३५ ॥

हे अविदग्धमते हाटका, मी गुणवती आहें असें आतां

---

१ स्वच्छ. २ माझ्यापासून उत्पन्न झालेलें भूषण. ३ दैववान् लोकांच्या समूहास. ४ आपल्या तेजानें ५ राजस्त्रिया. ६ हत्तींना ज्ञात. ७ आपल्या अंकुशानें. ८ माझी व्याप्ति. ९ भोक्त्याला. १० बायको. ११ विष्णूला. १२ लक्ष्मीवांचून दुसरी.

तुझ्या हृदयांत ठसलेंना? बाब्याच्या संध्येसारिखें पुनः मूळावर नाहींना येणार? तसें झालें तर मग नाइलाज! आतां माझ्या आणि तुझ्या अलंकारांची जी योग्यता ती सर्वलोकांच्या लक्षांत येऊन चुकलीच असेल. कारण गजामध्यें आणि गर्दभामध्यें जें अंतर आहे तें शोधून काढण्यास ह्मणजे मोठा विचार करावा लागतो असें नाहीं. तो भेद आपोआप पुढें येऊन ठेपतो. हे कनका, आतां तूं असें कर तुझ्या आणि माझ्या अलंकारामध्यें जें अंतर वसतें तें तुला जर उघड दिसत नाहीं, तर या सभ्यांकडेस विचार, ह्मणजे तेच तुला सांगतील. परंतु दुराग्रहाचा त्याग न करशिल तर आणि जर तुझ्या हाडीं भरलेला दुर्विचार तुला सोडून बाहेरच जात नसेल तर मग हे सभ्य तरी सुराकुंभाला धुवून कितीसा शुद्ध करतील?

**सुवर्ण**—(कोपानें कंपमान होऊन) आः! दुष्टे, असंगतप्रलापिनी, काय तुला सांगूं! अगे, तुझीं हीं उन्मादभाषणें श्रवण करून माझ्या सर्वांगांत अनिवार कंप उत्पन्न होतो आणि जो अतिशयित त्रास होतो तो सहन करवेना; काय करूं! रंडे मुक्ते, तुझ्यासारखी अन्य कृतघ्न सर्व ब्रह्मांडांत शोध केला असतांही मिळण्यास अशक्य आहे. हे पापिष्टे, माझ्या आश्रयानें योग्यता मिरवून मलाच तुच्छ कारितेस काय? हे दुराचारिणि, माझ्या संगानें तुझी कोठें तरी डाळ शिजते हें तूं विसरलीस काय! हाय! हाय! केवढा हा कृतघ्नपणा!

आर्या ( गीति· )

सुजनोपकृति[१] न जाणे जो लोकीं एक तो दुराचारी ।
वाजी[२] हाणोनि चरण फोडी स्वाश्रयहि मंदुरा[३] चारी ॥३६॥
और्वानल[४] सिंध्वाश्रित[५] परि शोषित तदीय वारिनिकरातें[६] ।
आरण्यकहि[७] कुठारें तोडी वृक्षा उभारुनि करातें ॥३७॥
आश्रित हि रोग दूषी देहा तैसा कलंक सोमातें ।
तूं ही मदाश्रया[८] मज दूषिसि तव संगही नसो मातें ॥३८॥
मिरवुनि मदाश्रयें तूं अकृतज्ञा[९] निंदिसी मला जडंजे[१०] ।
जड ते दक्षचि परकृत[११]— विस्मरणीं भूमिलाहि अति जड जे
॥ ३९ ॥

श्लोक ( पृथ्वी· )

यदा वससि तूं गलीं श्रवणिं नासिकाग्रीं करीं
मदाश्रयचि शोभवी तुज विचारणा हे करीं ।
त्यजीं सदय मी न तोंचि जन हा विचारी तुला
विरोध करिशी मशीं कसि न जाणतां हेतुला ॥

हे पापिणी, आश्रयदात्याची निंदा करतेस काय? छिः! या गुरुद्रोहानें तुझ्या सर्वांगाला कीटक पडतील! (सभ्यांकडेस) सभासदहो, या वराकीचें ऐकिलेंना उच्छृंखल भाषण?

---

१ सुजनानें केलेले उपकार· २ घोडा· ३ अश्वशाला· ४ वडवाग्नि· ५ समुद्राच्या आश्रयानें रहाणारा· ६ उदकसमूहातें ७ अरण्यांत रहाणारा· ८ माझ्या आश्रयानें असणारी· ९ केलेले उपकार न जाणणारी· १० जडापासून झालेली अर्थांतरानें जलापासून· ११ परानें केलेले उपकार विसरण्याविषयीं·

तुह्मीच सांगा बरें या भाषणानें मला कोप यावा किंवा न यावा तो. अहो, या अभद्रप्रलापिनीनें मघांपासून जी बडबड लाविली होती ती ऐकून मला तेवढें असह्य वाटलें नाहीं, परंतु 'ज्या ठिकाणीं माझी ( मुक्तेची ) व्याप्ति आहे त्या ठिकाणीं तुला विचारतो कोण?' हे शब्द ज्या वेळीं माझ्या कानांत तप्तलोहाच्या अर्गलेसारखे शिरले त्या कालापासून मला चैन पडेनासें जाहलें आहे. कारण हा कालपर्यंत या वराकीला आश्रय देऊन जो म्यां सांभाळ केला होता तो या दुष्टेनें एकाच शब्दानें व्यर्थ केला. सभ्यांनो, या मुक्तेला मी असें विचारितों कीं तूझी व्याप्ति आहे तेथें मला कोणच जर विचारीत नाहीं तर माझ्यावांचून तुझी व्याप्ती तरी झाली कशी? मला विचारल्यावांचून तुझा काय उपयोग होणार आहे? हे अविदग्धे, म्यां कृपा करून तुला आश्रय दिला ह्मणून सर्व विलासी जन तुझा सत्कार करतात आणि मी जर तुझा तिरस्कार करीन तर तुझ्या गुलिकांचा कोणता उपयोग होणार आहे? जर यांना रुची असती तर ह्या चणकांसारख्या तोंडांत टाकण्याच्या तरी कामीं पडल्या असत्या, मला वाटतें कीं चणकादिक जीं धान्यें त्यांच्या गुलिकांचीही योग्यता तुझ्याठायीं नाहीं, कारण त्या गुलिका स्वतंत्र असून रुचि देतात आणि तुझ्यानें पराश्रयावांचून कांहींच होत नाहीं. ( सभ्यांकडेस ) सभ्यांनो, खरेंच सांगा, योग्याच्या आश्रयानें कोणाला बरें योग्यता प्राप्त होणार नाहीं? '**महानुभावसंसर्गः कस्य नोन्न-**

तिकारकः । रथ्यांबु जान्हवीसंगात्रिदशैरपि पूज्यते' त्रैलोक्याला पवित्र करणाऱ्या भागीरथीचा संग जर खातकोदकाला घडला तर तें अत्यंत अपवित्र असोन देवांलाही पूज्य होतें असा महदाश्रयाचा प्रभाव आहे. अहो, असें पहा, सौगंधिक पुष्पांच्या सहवासानें मुंगीसुद्धां चंद्रशेखराच्या मस्तकीं आरूढ होऊन जटाजूटांत रहाणाऱ्या अमृतकरालाही चुंबित असते; तसाच महंतांनीं आपला आश्रय देऊन मंत्रतंत्रादियोगानें प्रतिष्ठित केला असतां पाषाणही देव ह्मणण्याला योग्य होतो. तस्मात् थोराचा आश्रय मिळाला तर नीचांनां सुद्धा मोठी पदवी प्राप्त होते. सभ्यमहाराज, तुह्मी असा विचार करा कीं माझा आश्रय जर यःकश्चित् काचेला मिळाला तर ती सुद्धां मरकत रत्नाची योग्यता मिरवीत असते. मोठ्या विचारवंतालाही तिची परीक्षा होण्याची मारामार पडते. नीच वस्तूंला ह्मटला ह्मणजे थोराचाच आश्रय पाहिजे. कारण त्यांच्याकडेस स्वतंत्र गुण कमीच असतो आणि वास्तविक महत्त्व मिळविण्याकरितां थोरांचाच आश्रय करीत असतात. आतां जे महान् आहेत ते आपल्याच तेजानें सर्वांचेंही अतिक्रमण करून शोभत असतात. पहा, सूर्य जो आहे तो आपल्याच तेजानें सर्व भुवनाला प्रकाशित करून तिमिराचें हरण करितो. त्याला पराश्रयाची अपेक्षा आहे काय? बरें, त्या सूर्याला उपकरणें तरी चांगलीं आहेत काय? एकतर सारथी थोडका, रथ आहे तो एकचक्र, तसेच अश्व विषम आणि

विषदूषित, असें असतां तो एका दिवसांत निरालंब मार्गाचें अतिक्रमण करितो. यास्तव महानाला पराश्रयाची आणि उपकरणाची गरजच नाहीं. ते स्वतंत्र असून आपल्याच आश्रयानें इतरांलाही वागवितात. याविषयीं दूर कशाला गेलें पाहिजे? हेंच पहाना, मला इतरांच्या आश्रयाचें कारण नाहीं, मी स्वतंत्र असून माझ्याच वैभवानें शोभत असतों आणि या सर्व रत्नसमूहाला माझाच आश्रय पाहिजे असें असतांही कृतोपकारांला पश्चाद्भागीं करणारी ही रंडा मला आश्रयदात्याला नानाप्रकारंच्या दुष्टशब्दांनीं विदारिते. या नीचेला आश्रय जर मी न देईन तर ही निःसार वस्तु पाहिजे तरी कोणाला? मग या पापिणीचें जीवित्व सुद्धां विफल होणार आहे. हें तत्त्व मानसीं मुळींच न आणितां माझ्यापुढें सर्वां देखत 'माझी व्याप्ती ज्या ठिकाणीं आहे त्या ठिकाणीं तुला विचारतो कोण' असें स्पष्ट ह्मणण्यास या आश्रितेला कोठून सामर्थ्य उत्पन्न झालें? अहो या कृतघ्नेची जिव्हा त्याच वेळीं कशी सहस्रधा विदीर्ण झाली नाहीं? असो, इतरांला किमर्थ दोष लावावा? हा माझाच अपराध आहे. म्या खलास कां आश्रय द्यावा? खलांचा ह्मटला ह्मणजे स्वभाव असाच. त्या पामरांचा किती जरी सत्कार केला तथापि ते उपकारांकडे पृष्ठभाग करून उलट सत्कारकर्त्यावरच फिरतात. हें आतां तर माझ्या पक्कें प्रत्ययाला आलें आणि यावर मला एका पंडिताची उक्ती ही आठवली '**संवर्धितोपि सहसा भुजगो न वश्यस्तत्पाल-**

कानपि निहंति बलेन सिंहः । दुष्टः परैरुपकृतस्तदनिष्ट-कारी विश्वासलेश इह नैव बुधैर्विधेयः ’ अर्थात् माझा घात ग्यांच केला. अन्यावर कसचा दोष? असो ( मुक्ते-कडेस वळून ) हे वराकि, माझ्या आश्रयानें श्रेष्ठता मिळवून माझीच निंदा करतेस तर खरेंच सांग, तूं शुद्धीवर नाहींस काय? काय तुला लज्जाच नाहीं? मला वाटतें कीं तूं शुद्धी-वरच नाहींस. जर तूं शुद्धीवर असतीस तर या आश्रयदा-त्याबरोबर कलह करण्यास समोर आलीच नसतीस; कारण ‘ आश्रयस्य विरोधेन स्थातुं शक्तिर्भवेत्कुतः । जीवनस्य विरोधेन मत्स्यानां का गतिर्वद ’ जीवनाच्या आश्रयानें नक्रझषादि जंतु सुखानें रहातात असें असून त्या जलाशीच त्यांहीं कलह केला तर त्या जलचरांची काय स्थिती होईल? तस्मात् उपजीव्याशीं विरोध करणें हें आपणासच घातक आहे. यास्तव तुला मी वारंवार जागृत करितों कीं माझ्या आश्रयानें तुला बरीच योग्यता मिळालेली आहे. असें अ-सून जर तूं माझी निंदा करशील तर अगदींच कंडेलोट होऊन जाशील.

**मुक्ता**–( मत्सरयुक्त होऊन ) हे योग्यायोग्यविचारहीना आत्मश्लाधिन् सुवर्णा, तूं मातीच्या खाणी पासून उत्पन्न हो-णारा तुला ज्ञान कोठून असणार? मूर्खा, आश्रयानें यो-ग्यता मिळते काय? आश्रितवस्तु जर गुणहीन असेल तर आश्रय कितीसी योग्यता देणार आहे; विचार करून पहा. सर्व वस्तु आपल्याच गुणांनीं शोभत असतात. योग्यायोग-

षयीं जर आश्रय कारण आहे तर एकाच आश्रयानें अनेक वस्तु असतात, परंतु त्यांमध्यें सर्वांची योग्यता समान नसते. याविषयीं तुला एका महाकवीच्या मुखांतील दृष्टांत सांगतें ह्मणजे तेवढ्यानें तरी तुझ्या मूढमतीस समज आला तर येईल. 'दैवाद्यद्यपि तुल्योऽभूत् भूतेशस्य परिग्रहः। तथापि किं कपालानि तुलां यांति कलानिधेः' सर्व देवांमध्यें श्रेष्ठ महादेव असें बहुमतें सिद्धच आहे; त्या श्रेष्ठानें आपल्या जटामुकुटांत नृकपालें आणि चंद्रमा या दोनही पदार्थांचें तुल्यप्रीतीनें एकाच जागीं धारण केलें ह्मणून कलानिधीची तुलना त्या कपालांला मिळेल काय? पहा, सर्वगुणालय जो चंद्रमा तो आपल्याच गुणानें जगन्मान्य होऊन गेला. त्या गुणवंताचा जर उदय झाला तर सागराला उल्लास होतो, कैरवांचा विकास होतो, तिमिराचा विनाश होतो, चंद्रकांताला द्रव सुटतो, आणि सर्व लोकांचा संताप दूर होतो. असे चंद्राच्याठायीं बहुतेक जे सद्गुण आहेत त्यांतून एकादा तरी त्या अमंगल कपालांला त्या महानाच्या आश्रयानें कां बरें प्राप्त झाला नाहीं? बरें, चंद्राच्याठायीं जो कलंक ह्मणून एक अवगुण आहे तो त्या थोराच्या आश्रयानें कां दूर झाला नाहीं सांग बरें? असो, यांत सार एवढेंच कीं आश्रयाच्या योगानें अवगुणाचा लोप होतो अथवा योग्यता वाढते असा नियम नाहीं. यास्तव हे अल्पमते, तुझ्यापासून मला योग्यता मिळते असा जो तुला भ्रम झालेला आहे तो निःसंशय मूर्खत्वाचा आहे, आतां माझ्या योगानें मात्र

तुला शोभा आलेली आहे यांत संशय नाहीं. तूं असें पहा, आकाशाच्या आश्रयानें नक्षत्रें असतात परंतु नक्षत्रांच्या तेजानें एकंदर नभोमंडल शोभत असतें. आकाशाच्या तेजानें नक्षत्रें शोभतात असें कोणी तरी ह्मणेल काय? तुझ्यासारखा अतिमूर्ख असेल तो मात्र ह्मणेल. आतां या जागीं आणखीही तुला उदाहरणें दाखवितें:—

श्लोक ( उपजातिः )

सदैव ही आश्रित[1] पात्रेंवर्ती[2]
तो दीप ज्या आश्रय तैलवर्ती ।
परि स्वतेजें हरितो तमातें
तो कीं तदीयाश्रय[3] सांग मातें ॥ ४१ ॥

श्लोक ( अनुष्टुप् )

सदैव जो आश्रितचि ज्याला काष्ठचि आश्रय ।
तो वन्हि श्रेष्ठ कीं काष्ठ मूढा सांग विचारुनी ॥४२॥

ऐकिलेंस काय कनका? या दोनही उदाहरणांवरून आमच्यामध्यें अधिकत्वाचा विचार तूंच कर ह्मणजे झालें. अरे, दीप ह्मटला ह्मणजे जन्मापासून आश्रितच. तो तैलवर्तीच्या आश्रयावांचून कधींच असत नाहीं. तसाच अग्निही नित्य काष्ठाच्या आश्रयानेंच असतो, परंतु ते दीपाग्नी आपल्याच गुणांनीं शोभून आपल्या आश्रयालाही शोभवीत असतात, आणि त्यांच्यापासून बहुत लोकांचीं कार्यें होतात.

---

१ आश्रयानें असणारा. २ पात्रांत रहाणारा. ३ तेल वात आणि समई हा त्याचा आश्रय.

यांच्या महत्त्वाचा लेश तरी आश्रयाच्याठायीं आहे काय? हे हाटका, जर दीपाहून तैल आणि दशा गुणांनीं अधिक असतील, अथवा अग्नीपेक्षां तदाश्रय जें काष्ठ तें दाहकत्वादि गुणांनीं जर विशिष्ट होईल तर तूंही माझ्याहून श्रेष्ठ होशील. अरे, तूंच पूर्वीं जन्यजनकभावामध्यें श्रेष्ठत्वाच्या अनियतत्वाचा सिद्धांत केलास; त्याचप्रमाणें आश्रयाश्रयिभावाचा विचार करण्यास आतांच तुला काय झालें? तसाच शुद्धीवर येऊन हाही विचार कर, ह्मणजे माझ्यापासून तुला शोभा कीं तुझ्या-पासून मला, हें तुझ्याच लक्षांत येईल. मात्र, विचाराचा अपलाप करून मीच सर्वांहून श्रेष्ठ अशा आत्मस्तुतीनें उगीच त्या जिभलीस श्रम देऊं नको.

**सुवर्ण**–( उपहास करून ) सभ्यांनो, ऐकिलेंना या मुक्तेचें पाखंड भाषण. चार्वाकशास्त्रामध्यें ही बरीच तयार आहे. मला वाटतें कीं ही तोंडानें घोड्याचा गाढव आणि गाढवाचा हत्ती एका क्षणांत करील. इकडे तिकडे ओढून ताणून या निर्लज्जेनें श्रेष्ठपणा आपल्याकडे सरासरी बळजो-रीनें आणलासा केला, परंतु असल्या खटाटोपानें थोरपणा येतो काय? तो काय रस्त्यावर थोडाच पडला आहे. मी तो मीच, आणि बिचारी मुक्ता ती मुक्ताच. काय सभासद, तु-ह्मांला कसें वाटतें?

**सभ्य**–( चकित होऊन ) हे धातुपते, आह्मीं यांत काय सांगावें? विचार केला तर तुह्मी उभयतां श्रेष्ठच आहांत, परंतु तुमच्या विवादावर लक्ष पुरविलें असतां तुझें प्रतिपादन

ऐकिलें तर तूं श्रेष्ठ वाटतोस. आणि मुक्तेचें प्रतिपादन ऐकिलें तर मुक्ता श्रेष्ठ वाटते.

**सुवर्ण**—वः ! शाबास ! बरा निवाडा केलात. कावळा झाला तर उडेल आणि उंदीर झाला तर बुडेल असें करूं नका. तर मुक्तेच्या आतांच्या प्रतिपादनावरून मुक्ता तुह्मांला श्रेष्ठ वाटली, असें अर्थतः झालेंच. छिः ! केवढा हा असावधपणा. अहो, जो वक्ता आहे तो आपल्या वक्तृत्वशक्तीच्या बलानें एकाद्या लघुवस्तूस गुरुत्व आणितो आणि स्वेच्छानुरूप गुरुवस्तूच्या ठायीं लघुतेचा आरोप करितो, ह्मणून खरेपणा बुडालाच काय? असो, या मुक्तेचें मुखमार्जन तुमच्या समक्ष बरेंच केलें पाहिजे, परंतु आतां सूर्यास्तमानसमय झाला यास्तव याविषयींचा सिद्धांत उद्यांच काय तो करूं.

(सर्व उठून जातात.)

## पहिला अंक समाप्त.

---

## अंक. २

### प्रवेश. १

(यथापूर्व सेवकानें सभेंत बंदोबस्त ठेवल्यानंतर पंडितांसह सभ्य सभास्थानीं प्रवेश कारितात.)

**सभ्य**—अहो पंडित, कालच्या दिवसांत घडलेला सुवर्णमुक्तेचा विवाद ऐकून भलीच मौज वाटली आणि दिवसही बराच आनंदानें गेला.

**पंडित**—होय, आज सुदिन आहे असें आपण पूर्वीच ह्मटलें होतें ना? मग आनंद झाला यांत आश्चर्य नाहीं.

**सभ्य**—बाकी सर्व असो, क्षुधा, तृषा, निद्रा, आलस्य यांची सुद्धां बाधा कांहींच झाली नाहीं. बरें, पण सुवर्ण आणि मुक्ता या दोघांचें अद्यापि आगमन झालें नाहीं याचें कारण काय बरें असावें?

**पंडित**—अद्यापि येण्याचा समय आहे, आह्मीच किंचित् उत्कंठित होऊन पूर्वी आलों.

(पंडितांसह सभ्य प्रतीक्षा करीत बसतात. इकडे सुवर्ण अतिचिंतातुर होऊन रजताच्या समोर जातो आणि दुःखानें दीर्घ उच्छ्वास सोडून बसतो. इतक्यांत रजत मोठ्या गडबडीनें समोर जाऊन प्रणिपात करितो.)

**रजत**—महाराजांचा जय असो.

**सुवर्ण**—कल्याण! वत्सा रजता, काय सांगू. मला या वेळीं कांहींच सुचत नाहीं. माझी अगदींच पिसाळल्याची

गत झाली आहे. मनाच्या स्वाधीन सर्व इंद्रियें आणि तें मनच जर शुद्धीवर नाहीं तर इतर इंद्रियांचें काय सांगावें?

**रजत**—स्वामिन्, धातुपते, हें काय बरें? आपण सर्वांस सुखकारक असून आपणास कोणत्या पाप्यानें असें दुःख दिलें?

**सुवर्ण**—अरे, दुःख पण किती दुःख ह्मणून सांगूं? आत्महत्या करूं नये ह्मणून मात्र देहाचें रक्षण करावें, नाहीं तर या समयीं जीवित्वाचा देखील कंटाळा आला आहे.

**रजत**— इडापीडा टळो अमंगळ जळो. शिव शिव! धातुराज, काय हा अनर्थकारक संकल्प! आपण सर्वांचें जीवन असून असा आत्मघात केला तर सर्व लोकांनीं जावें तरी कोठें? असें हें अशुभ पाप्यास घडो. आपण जगलां तरच सर्व लोकांची जीविका होणार. असो, पण महाराज असा अनुताप होण्यास कारण तरी काय झालें?

**सुवर्ण**—अनुताप होण्याचें कारण सांगतों, मात्र अवधान देऊन ऐक. एथून जवळच असणाऱ्या सभेंत बऱ्याच अधिकाराचे सभ्य व पंडित मिळाले होते. त्यांत एका सभ्यानें एका पंडितास सहजच प्रश्न केला कीं सुवर्ण आणि रत्न यांमध्यें श्रेष्ठ कोण? असा प्रश्न ऐकतांच त्या पंडितानें स्पष्ट निवाडा न करितां संदिग्ध भाषण केलें. तें एकाएकीं माझ्या कानांत पडलें. त्याच वेळीं मी मोठ्या आवेशानें त्या सभेंत येऊन त्या पंडिताच्या संशयित भाषणाचा निषेध केला. आणि यथार्थत्वें माझ्या महत्त्वाचें वर्णन केलें. त्यांत मीं उगीच मिथ्यागुणाचा आरोप केला असें नाहीं. माझे गुण

सर्व लोकांत प्रसिद्धच आहेत, आणि आपलें स्वरूप आहे त्याप्रमाणें न्यूनाधिकत्व न करितां जर प्रकट केलें तर ती आत्मस्तुति होते असें नाहीं. परंतु तें त्या नीच मुक्तेला अगदींच आवडलें नाहीं आणि दुष्टेनें जी माझी निंदा केली तिचा माझ्यानें तुझ्या समोर उच्चार देखील करवेना. अनुजा, तुला काय सांगूं ? मला ती निंदा ऐकल्यापासून चैन पडेनासें झालें आहे. आणि सर्वांगांत अतिशय त्रास होत आहे. काय करूं, निद्रा तर मला सोडून गेली.

**रजत**—( मत्सरयुक्त होऊन ) आँ! मुक्ता एवढी उन्मत्त झाली काय? तर ती पापिष्ठा आपल्या आश्रयाला विसरलीच वाटतें. अहो, नीचांचा स्वभावच तसा. त्यांच्यानें परोत्कर्ष पहावतच नाहीं. ‘ **दह्यमानाः सुतीव्रेण नीचाः परयशोऽग्निना । अशक्तास्तत्पदं गंतुं ततो निंदां प्रकुर्वते** ’ ह्मणजे नीच प्राणी पराच्या कीर्तिरूप अग्नीनें नित्य जळत असतात तरी परासारखी कीर्ति मिळविण्यास ते मुळींच समर्थ होत नाहींत. मग त्याणीं निंदेवांचून आणखी काय बरें करावें? जसें सर्पाचें बळ विष, बाळाचें बळ रुदन अशक्ताचें बळ क्षमा, तसें निंदा हेंच नीचाचें बळ होय. मग त्याप्रमाणें नीचानें स्वभावानुसार जर निंदा केली तर त्यांत आपला तोटा तो काय आहे ? उलट लाभच आहे. कसा ह्मणाल, तर आपलें पाप निंदकास जातें आणि निंदकाचें पुण्य आपल्यास मिळतें. याकरितां निंदक आमची निंदा करितो हे त्याचे उपकार मानिले पाहिजेत.

**सुवर्ण**–( रोषानें ) छिः ! हें काय बोललास? हा निवृत्तिमार्गाचा विचार आणि आमची विषयी लोकांत गणना, यावरून हा मार्ग आह्मांस प्रतिपक्षीच आहे, हा तूं विचारच केला नाहींस काय? तुझ्या मतानें त्या दुष्टेची निंदा सोसून आह्मीं उगीच बसावें काय? काय अविचार हा! अरे क्षमा कोणी करावी हें तूं वर सांगितलेंच आहेस. '**क्षमा बलमशक्तानां**' ज्यांस सामर्थ्य नाहीं त्यांणीं क्षमा करावी अथवा जे अभिमानाचा त्याग करून विरक्त झाले आहेत त्यांना एक क्षमा योग्य आहे. ते दोन्ही प्रकार या दिशेस आले नाहींत, मग क्षमा तरी कशी येईल बरें? असो, तुझ्याच मनाप्रमाणें क्षमाही करितां येईल, परंतु तशी जागा तरी असली पाहिजे. उगीच भलत्या ठिकाणीं भलतेंच केलें तर अनवस्था होते. नीतिशास्त्र असें आहे कीं, क्षमा हेंच पुरुषाला भूषण, परंतु पराक्रमाच्या जागीं नव्हे. शत्रु हातांत नागवें शस्त्र घेऊन मान कापण्याविषयीं सिद्ध झाला आणि आपण जर क्षमा धारण केली तर हें मानधनास केवढें बरें अपकीर्तिकारक आहे? त्या जागीं धैर्य धरून पराक्रमच केला पाहिजे. जसें स्त्रियांस लज्जा हेंच भूषण, परंतु गर्भाधानाच्या रात्रीं पतिसांनिध जाण्यास त्यांनीं त्या लज्जेचा आश्रय केला तर तें भूषण न होतां दूषण होतें. ह्मणून त्या ठिकाणीं रमणीनें धैर्यच धारण केलें पाहिजे. तद्वत् मानधनानेंही परिभवाच्या प्रसंगीं पराक्रमच करणें योग्य आहे. तस्मात् तुझे हे निवृत्तिमार्गाचे विचार मला या वेळीं

मुळींच ग्राह्य नाहींत. माझें समाधान होण्याजोगा एकादा उपाय सांगणें असेल तर सांग, नाहींतर उगीच रहा.

**रजत**–( सभय होऊन ) महाराज, कोप करूं नका, शांत व्हा, स्वामीनें दासावर जर कोप केला तर दास कोणीकडे जाईल बरें? सरकार, आपण माझा अभिप्राय लक्षांत न घेतां उगीच माझ्यावर दोष केला. धातुपते, आपण पराक्रम सोडून क्षमाच करावी असें माझें ह्मणणें नाहीं. पराक्रमच करावा, परंतु केवळ निंदेच्याच योगानें अगदीं खिन्न होऊन श्वासोच्छ्वासांनीं व्यर्थ आपण शरीर शुष्क करूं नये याकरितां बोललों. त्याचा विषाद धरूं नये. बरें, धातुराज, ज्या वेळीं सर्वांसमक्ष सभेंत मुक्ता अनर्गल भाषणें बोलली त्या वेळीं आपण कांहींच उत्तर केलें नाहीं काय? मला वाटतें कीं बरेंच दंतभग्न होण्याजोगें समर्पक उत्तर आपणही दिलें असावें.

**सुवर्ण**–समर्पक उत्तर दिलें ह्मणून विचारतोस काय? मी तरी त्या वराकीला कोठें धड सोडली आहे ? यथेच्छ पाहिजे तशी झोडली, परंतु ती माझीच आश्रित आहेना? तूं असें पहा, स्वामीनें सेवकाची किती जरी निर्भर्त्सना केली तरी तो आश्रित असल्यामुळें त्याचा ह्मणण्यासारखा मानभंग होत नाहीं, परंतु उलट त्या सेवकानें जर आश्रय दात्याची अवज्ञा केली तर त्याला तें किती लाजिरवाणें होईल बरें? मला तर तें मृत्युप्रायच झालें. अरे, ती इतर दुष्टवचनें पुष्कळ बोलो, त्यांपासून मला फार नाहीं व्यथा वाटत.

परंतु 'माझ्यापुढें तुला विचारतो कोण' आणि 'तूं गुणहीन आहेस' ह्या तिच्या दोन उक्ति वारंवार माझ्या हृदयांत असह्य वेदना उत्पन्न करितात.

**रजत**—छिः! छिः! ते मूर्खपणाचे प्रलाप शहाण्यानें मुळींच लक्ष्यांत आणूं नयेत. महाराज, तुह्मीं असा विचार करा कीं आमची सर्व ठिकाणीं व्याप्ती असून सर्व लोकांचीं कार्यें आमच्या वांचून होत नाहींत. असें असतां केवल मुक्तेनें तुह्मांस कोणच विचारीत नाहीं, असें जरी ह्मटलें तथापि तें ह्मणणें लोकांमध्यें मान्य होईल काय? त्याचप्रमाणें ती रंडा तुह्मांला गुणहीन ह्मणते, परंतु आपले सद्गुण सर्व लोकांत प्रसिद्ध आहेत. पहा, गुणहीन जरी पुरुष असला, तथापि तोही तुमच्या संगानें गुणवान् ह्मणण्यास योग्य होतो. असें असतां साक्षात् तुह्मांलाच गुणहीन ह्मणणारी मतिमंद मुक्ता लोकांमध्यें किती उपहासास्पद होईल बरें? शहाणे लोक तिला शेणमार कीं हो करितील! महाराज, शास्त्रप्रवर्तकांचें ह्मणणें असें आहे '**सर्वे गुणाः कांचनमाश्रयंति**' ह्मणजे सौंदर्य, चातुर्य, दया, दाक्षिण्य, वक्तृत्व, पांडित्य, शौर्य इत्यादि सद्गुणांचा समूह कांचनाचाच आश्रय करून असतो. कांचनाची पूर्ण दया ज्यावर असेल त्याच पुरुषाकडेस हे सर्व सद्गुण वसतात. एकादा धनवान् पुरुष अवगुणी जरी असला तथापि त्या धनाच्या तेजानें त्या पुरुषाला कोणीही अवगुणी ह्मणत नाहींत; आणि तो सर्वलोकांत मान्य होतो, आणि धनानें जर पाठ केली आहे तर तो कुलीन असो, वक्ता

असो, चतुर असो, किंवा दर्शनीय असो, कसाही जरी असला, तथापि धनवंतापुढें अगदींच कडेलोट होऊन जातो. त्याला कोणीच विचारीत नाहींत. '**ब्रह्महापि नरः पूज्यो यदि स्याद्विपुलं धनम् । शशिना तुल्यवंशोऽपि निर्धनः परिहीयते**' ज्याच्याकडेस धनसंग्रह विपुल आहे तो पुरुष ब्रह्महत्या करणारा कां असेना, त्याच्या दोषांकडे कोणीच पहात नाहींत, आणि त्याला सर्वठिकाणीं पूज्य मानितात. गुणवंत लोक देखील त्याच्या अंगणांत प्रतिदिवसीं दासासारिखे लटकत असतात, आणि धातूची जर अवकृपा असेल तर तो पुरुष चंद्रासारख्या शुद्ध कुलांत जरी उत्पन्न झालेला असला तथापि त्याचा सर्व लोक कंटाळा करितात. सुहृत्, संबंधी, ज्ञातिवर्ग किंबहुना, दारा पुत्र देखील त्याचा परित्याग करितात. तस्मात् असा आपल्या आश्रयानें सर्वगुणांचा समूह वसत असतां नीचमुक्तेनें आपणास गुणहीन ह्मटलें किंवा कोणत्यांही मिथ्यादोषाचा आरोप केला ह्मणून त्यांत आपला काय तोटा झाला? अशीं गजेंद्रापुढें श्वानें किती भुंकत असतात? महाराज, तिच्या भाषणानें तुमचा गुणौघ उणा होईल काय? '**मलोत्सर्गं गजेंद्रस्य मूर्ध्नि काकः करोति यत् । कुलानुरूपं तत्तस्य यो गजो गज एव सः**' एकाद्या वेळीं कावळा गजेंद्राच्या मस्तकावर मलोत्सर्ग करीत असतो, आणि हें कर्म त्याच्या नीच स्वभावाला उचितच आहे, ह्मणून एवढ्यानें त्या गजेंद्राचा थोरपणा कमी होत नाहीं. गज तो गज आणि बिचारा कावळा तो कावळाच.

धातुराज, हा विचार मी आपणास सांगितला पाहिजे असें नाहीं. आपण केवल विचाराचे निधीच आहांत. परंतु केवल नीचमुक्तेच्या उच्छृंखल भाषणानें अत्यंत खिन्नता धारण करून श्वासोच्छ्वासांनीं वारंवार शरीर शुष्क करीत आहां हा मात्र अविचार आजच रस्ता चुकून या विवेकसद्मांत प्राप्त झाला. या दुर्जनाला लागलाच पिटाळून घालवा ह्मणजे झालें.

**सुवर्ण**—वत्सा रजता, म्यां अविचाराला माझ्या हृदयांत आश्रय दिला असें तूं समजूं नको. मी विचारानेंच वागतों, परंतु विषतुल्य त्या दुष्ट शब्दांची वेदना माझ्यानें सहन करवली नाहीं. अरे, दुर्जनाच्या वाक्‌शरांपासून किती वेदना होते हें अद्यापि तुला समजलें नाहीं ह्मणून तूं अशा विचाराच्या गोष्टी सांगतोस. असो, निरर्थक भाषणें करून कोणता फलादेश आहे? उगीच जीवाला क्लेश मात्र होतात, याकरितां हा वाक्‌पसारा आटपून या वेळीं जो बोलावयाचा विषय मनांत आला तोच बोलतों. अवधान देऊन ऐकशीलना?

**रजत**—महाराज, हें काय विचारलें! यावांचून या सेवकाला काय अधिक आहे! कर्ण तृषित होऊन वाट पहात आहेत. आतां विलंब कां?

**सुवर्ण**—वत्सा रजता, त्या मुक्तेचा तरी अपराध कसचा? हीं मुक्तादिरत्नें उन्मत्त होण्याला कारण मीच आहें. अरे, जर मी यांना मुळींच आश्रय दिला नसता, तर या निराश्रि-

तांला कोण विचारणार होता? आणि यांस गर्व तरी एवढा कां झाला असता? तस्मात् या खलांला जवळ करून माझा शत्रु मीच झालें; आणि या दुर्भगेनें माझे उपकार बरेच फेडले. बरें असो, मागें काय झालें तें झालें. आतां यानंतर मात्र या सर्व रत्नांचा भाग्योदय सरला. आजपासून या कपाळकरंट्यांच्या प्रारब्धावर दगडच पडला यांत संदेह नाहीं.

**रजत**—काय? प्रारब्धावर दगड पडला तो कसा बरें?

**सुवर्ण**—अरे, कसा ह्मणून नकळल्यासारखा काय विचारतोस? आतां मी काय त्यांनां पुनः आश्रय देणार आहें? कशाला गोष्ट काढतोस? या खलांशीं मैत्री करून मला पुरेशी झाली आहे. (आश्चर्ययुक्त होऊन) अहाहा! काय सांगूं? नीतिशास्त्रप्रवर्तकांच्या ज्ञानाला पारच नाहीं! त्यांची बुद्धि अतर्क्य खरी. आजच्या प्रत्ययावरून एका नीतिज्ञाचें वचन मला खरें दिसून आलें. तें असें 'हरेः पादाहतिः श्लाघ्या न श्लाघ्यं खररोहणम्। स्पर्धापि विदुषा युक्ता न युक्ता खलमित्रता' ह्मणजे, सिंहानें अवज्ञा करून लाथ जरी मारली तथापि ती वर्णनीय होते, परंतु गाढवानें मोठी ममता करून पाठीवर बसवून जरी फिरविलें तरी तें युक्त नव्हे; कारण गाढवावर बसला ह्मणून लोक उपहास करितील. तद्वत् योग्याशीं स्पर्धा जरी घडली तथापि शोभते. परंतु खलाशीं मैत्री सुद्धां पुरवत नाहीं. वाः शाबास! या कवीच्या वचनाला मोल तरी आहे काय? माझ्या तर हृदयांत हें बिंबून गेलें. याकरितां यांचा सहवास सोडून आतांच

मुक्त व्हावें. हें सर्व प्रकारें चांगलें. वत्सा रजता, यांत तुला कसें काय वाटतें?

**रजत**—धातुराज, आपल्याहून माझा विचार विशेष आहे काय? आपण विचाराची जन्मभूमीच आहां. यासाठीं आपण जो सिद्धांत ठरविला तो अयथार्थ ह्मणण्यास मी समर्थ नाहीं, परंतु या वेळीं जें माझ्या मनांत आलें आहे तें चरणाकडेस निवेदन करितों. युक्त वाटल्यास ग्रहण करावें. धातुपते, मुक्तेनें जरी आपण केलेल्या उपकारांकडेस पाठ वळून असें कर्म केलें, तथापि हें तिच्या नीचस्वभावाला उचितच आहे. परंतु हा तिचा रोष मनांत बाळगून अंगीकृतपदार्थांचा त्याग करणें हें मात्र आपल्या थोरपणास युक्त दिसत नाहीं. कारण '**अंगीकृतं सुकृतिनः परिपालयंति**' ज्या पदार्थाचा अंगिकार केला त्या पदार्थाचें नित्य परिपालन करणें हें थोराला अत्यावश्यक आहे. पहा, या पृथ्वीच्या आश्रयानें जे नानाप्रकारचे जीव रहातात त्यांपासून त्या पृथ्वीला किती बरें क्लेश भोगावे लागतात? असें असतां ती पृथ्वी अंगीकृत जीवांचा त्याग केल्यावर सकृप त्वाला बाध येतो याकरितांच तेवढेही क्लेश सोसून सर्व सहा या नांवाची अधिकारिणी झाली. एवंच जे सुकृती आहेत ते आश्रितांचा त्याग करीत नाहींत. तस्मात्, आपण त्या पुण्यशीलांच्या गणनेंतील असून आश्रिताचा त्याग करण्याविषयीं उद्युक्त झालां हें माझ्या मनाला युक्त दिसत नाहीं.

**सुवर्ण**—( किंचित् सक्रोध होऊन ) आः! काय हें भा-

षण! रजता, मघांपासून तुझ्या भाषणाचें तात्पर्य जर पाहिलें तर तूं क्षणक्षणीं शांतवृत्ती धारण करण्याचाच बोध करतोस. हा तुझा वाग्जल्प मला या वेळीं अगदींच आवडत नाहीं, ह्मणून तुला वारंवार सागतोंना? तथापि 'ये रे माझ्या मागल्या' पुनः पुनः तेंच. अरे, खलाकडेस खलत्वच धारण केलें पाहिजे "**दुष्टे दुष्टं समाचरेत्**" असें नीतिशास्त्र सुद्धां आहे. आश्रितानें जर दांडगाई केली तर आश्रय-दात्यानें त्यास योग्य दंड करावा यांत कोणताच दोष नाहीं. असें असतां या न्यायाकडेस तूं पहातच नाहींस आणि भलत्या जागीं भलत्याच नीतीचें स्थापन करतोस ही तुझी अगदींच बडबड आहे.

**रजत**—महाराज, मी आरंभींच सांगितलें आहेना माझ्या-ठायीं आपल्याहून ज्ञान विशेष नाहीं ह्मणून? परंतु जें मनांत आलें तें बोललों. असो, आतां आपण प्रतिज्ञेप्रमाणें करणारच, तथापि माझी आणखी यावर एक विनंति आहे. आज्ञा झाली तर बोलेन.

**सुवर्ण**—चिंता नाहीं, काय मनांत असेल तें सांग.

**रजत**—विनंति एवढीच कीं, आरंभीं आमच्या जातीचे सर्व धातु मिळून सभेंत जावें आणि मर्मभेदक वचनांहीं त-त्पक्षीय रत्नसमूहाचीं बरींच हाडें मोडावीं ह्मणजे तत्क्षणींच हतदर्प होऊन ते शुद्धीवर येतील आणि तेवढ्यानें जर त्यांनां मृदुत्व प्राप्त झालें नाहीं तर मग त्याग हा शेवटीं आहेच.

**सुवर्ण**—शाबास! युक्ति भलीच निवडून काढलीस. ही

माझ्या मनाला फार आवडली. आतां तसेंच करूं. ( असें ह्मणून सुवर्णादि सर्व धातु सभेंत जातात. )

**सभ्य**–( कौतुकयुक्त होऊन ) धातुराज, आलां काय आपण? एवढा कां बरें विलंब लागला? आह्मी एवढा वेळ पर्यंत आपलीच प्रतीक्षा करीत आहों.

**सुवर्ण**–एवढेंच का मला काम? एक साधक माझ्या प्राप्त्यर्थ बहुत दिवस उपासना करीत होता, त्याला दर्शन देऊन श्रीमान् करून येई तों पर्यंत एवढा वेळ गेला.

**सभ्य**–मुक्ता येऊन बहुत वेळ झाला.

**सुवर्ण**–तें ठीकच आहे, तिला एवढेंच काम. ज्याचें त्याचें आर्जव संपादन केल्यावांचून मुक्तेला विचारतो कोण? अहो, ती मुळीं आश्रितच आहेना? मग लोकांचा आश्रय केल्यावांचून तिची कशी कार्यसिद्धि होईल?

**सभ्य**–( हास्य करून ) या भाषणावरून आह्मांस आपल्या पक्षाला मिळविण्यासाठीं ही मुक्ता एथें पूर्वीं आली असें सिद्ध झालें.

**सुवर्ण**–यांत संशय कोणता? या वराकीला पराश्रयावांचून योग्यता मिळणारच नाहीं, आणि अशा तऱ्हेची पोकळ योग्यता या नीच मुक्तेला ह्मणून मात्र पुरवली. कारण ही मुक्ताही पोकळच आहे. अशी पराश्रयानें मिळणारी योग्यता मला बक्षीस घेऊन मिळाली तरी नको. कारण मानधनास त्या पोकळ योग्यतेपासून सुखप्राप्ति कधीं होणार नाहीं. अहो, तुह्मी असें पहा, महादेवाच्या आश्रयानें चंद्रमा

असतो, त्या चंद्राला महादेवानें मोठें महत्त्व देऊन मस्तकावर धरलेला आहे. केवढी त्याची योग्यता? परंतु ती पराश्रयोत्पन्न असल्यामुळें त्या चंद्राला कांहींच पुष्टता देत नाहीं, उलटा तो कृश मात्र होत जातो. तस्मात् पराश्रयापासून मिळालेली योग्यता मानधनाला फारच दुःख करणारी आहे. '**कष्टः खलु पराश्रयः**' ह्मणून त्याची इच्छा मी तर मुळींच करीत नाहीं आणि त्याची मला गरजही नाहीं.

**सभ्य**–तुला पराश्रय केव्हांच करावा लागत नाहीं काय?

**सुवर्ण**–छिः! हें काय असंभाव्य विचारणें तुमचें? तो इकडे मुळींच संस्कार नाहीं. माझा मात्र इतर आश्रय करीत असतात. याकरितां गुणज्ञमतानें माझ्या योग्यतेस तुलनाच नाहीं.

**मुक्ता**–(मत्सरयुक्त होऊन) अहह! काय आतां याच्या मूर्खत्वाला करूं! माझा नाइलाज आहे. अहो सभासद, या मतिमंदाचें मुखमार्जन तुमच्या समोर बहुवार केलें, परंतु याणें आपला हट्ट अद्यापि सोडिला नाहीं. किती जरि याला बोध केला तरी उपड्या घड्यावर पाणी घातलेंसें होतें. गुणज्ञहो, हा नपुंसक आपली योग्यता योग्यता ह्मणून जो बरळत आहे ती याची योग्यता तरी किती खंड्या भरलेली आहे हें याच्याकडेस विचारा. गुणज्ञ मतानें आपल्या योग्यतेस तुलनाच नाहीं असें हा मात्र मानितो, परंतु तेच गुणज्ञ याला तराजूंत घालून गुंजांसह तोलतात हें सर्व लोकांच्या अवलोकनांत आहे. असें असतां याला तुलना नाहीं

असें कसें ह्मणतां येईल? अधिकच जर याची योग्यता चढली तर गुंजातुल्य होईल, तीहून विशेष होणार नाहीं. (सुवर्णाकडेस वळून) बुद्धिमंदा सुवर्णा, तुझी योग्यता मला समजली:—

श्लोक (वसंततिलका.)

गुंजेसवें सतत योग्यचि तूं तुलाया[१]
मुक्तेसवें न समता उचिता तुला या।
स्पर्धा करी पिकगणीं[२] बलिपुष्ट[३] दुष्ट
त्या ये न ताक्ष्यसमता[४] करितांहि कष्ट ॥ १ ॥

हे मूढबुद्धे सुवर्णा, तूं गुंजेशीं स्पर्धा करावीस. कां ह्मणशील, तर तिच्याशीं तूं समान आहेस. नीतिशास्त्र असें आहे कीं सख्य अथवा वैर समानाशीं करावें. ह्मणजे तें शोभतें आणि पचतें, व त्यापासून परिणाम वाईट होत नाहीं. ह्मणून तुला वारंवार सांगतों कीं हा विचार सोडून जर तूं माझ्याशीं स्पर्धा करशील तर तुझा शेवटीं मोठा घोटाळा होईल.

**सुवर्ण**– (उपहासयुक्त होऊन) वः! कुंथून कुंथून केवढा तरी हा दोष काढलास? दुष्टे, तुला लज्जाच नाहीं. हे पापिष्टे, व्यवहारार्थ गुंजेशीं समतुलना केली ह्मणून हा का मोठा दोष झाला? असे दोष बहुतांच्या ठिकाणीं आरोपित केले जातील. (सभासदांकडे वळून) सभ्य महाराज, पाहिलात का खलस्वभाव? बहुत गुणाच्या ओघांत

---

१ तुलना करण्यास. २ कोकिलगणीं. ३ कावळा. ४ गरुडाची तुलना.

एकादा दोष अदृश्य होऊन गेलेला जरी असला, तथापि खलांची दृष्टि त्या दोषावर जाऊन जडते. ‘दोषेषु बद्धहृदया खलता नितांतमुष्ट्रावलीव पिचुमंदककंटकादौ’ उष्ट्र जो आहे तो रम्य बागेंत जरी शिरला, तरी कांटे खुंटेच शोधीत असतो; चांगल्या सौगंधिक पुष्पफलादियुक्त वृक्षांकडेस तो पहात देखील नाहीं. तसा खलही सुगुणातें सोडून दोषांच्या ठायींच बद्धहृदय असतो. महाराज, हें खोटें तर तुह्मीच पहा, ज्या गुणाला पाहून मोठे गुणवान् थक्क होऊन जातात त्या माझ्या सर्वोत्कृष्ट गुणांतून एकही या दुष्टेच्या दृष्टीस आढळला नाहीं, आणि कोठचा गुंजातुलनसंबधी जो मिथ्या दोष त्यांत या दुष्टेची दृष्टी बिंबून गेली. यावरून खल दोषदृष्टि खरे. त्या दुष्टांचीं वाळलेल्या सड्यावर नेऊन डोचकींच मारावीं. (मुक्तेकडेस वळून)

श्लोक (मंदाक्रांता.)

मुग्धे[1] मुक्ते अखिलगुणसंदोहरूपीं[2] सुवर्णीं
अल्पा गुंजासमतुलनदोषासि या कोण वर्णी[3]।
पीयूषास्त्रीं[4] सकलजगदानंदकंदीं[5] मृगांकीं[6]
अंका[7] प्रेक्षी कवण सुषमा[8] सोडुनी सुज्ञ लोकीं ॥२॥

हे अविचारिणि मुक्ते, आणखी एक तुला तत्त्व सांगतों. समर्थाकडेस एकादा जरी दोष असला तथापि तो गुणच

---

१ मूढे. २ अखिल गुणांचा जो समूह तद्रूप. ३ उच्चारी. ४ अमृतमय किरण ज्याचे. ५ सर्व जगाच्या आनंदाचें मूळ. ६ चंद्राचे ठायीं. ७ कलंकाप्रत. ८ शोभा.

मानला पाहिजे. पहा, महादेवानें कालकूट विषाचें प्राशन केलें तेणेंकरून कंठास काळेपणा आला, परंतु त्या कृष्णत्वदूषणास सर्व विद्वज्जन भूषणच मानितात. जर या दूषणाचा स्वीकार महादेवानें केला नसता, तर त्या कालकूटाग्नीनें सर्व प्राणिमात्राचा फडशा उडविला असता. त्याच प्रमाणें अग्नि संपूर्ण पदार्थांचें भक्षण करितो त्यांत अशुद्ध पदार्थांच्या भक्षणापासून त्या अग्नीच्या ठायीं मोठाच दोष लागू होतो, ह्मणजे ज्या पदार्थांस शिवूं नये ते पदार्थ तो निःशंक खातो. मग हा केवढा बरें दोष? तथापि तो समर्थ व तेजस्वी असल्याकारणानें तो दोष गुणरूप बनून गेला. कोणताही पदार्थ अग्नीच्या मुखांमध्यें पडला ह्मणजे तो शुद्ध होतो. यास्तव हा दोष जर अग्नीनें स्वीकारला नसता तर लोकांचा किती बरें अपघात झाला असता? तसाच म्यांहि या गुंजातुलनदोषाचा स्वीकार केला नसता तर व्यवहारसिद्धि न होतां लोकांत कलह उत्पन्न होऊन कार्यास प्रतिबंधकता प्राप्त झाली असती. तस्मात् लोकव्यवहारार्थ पतकरलेला दोष गुणाहून शतपट अधिक होतो यांत संदेह नाहीं. याकरितां हे मिथ्यादोषवादिनि मुक्ते, जो माझ्याठायीं गुंजातुलनदोष ठरविलास तो सर्वथा असत्य आहे. आतां ‘मुक्तेशीं तुला समानत्व नाहीं’ असें जें तूं भाषण केलेंस हें मात्र तुझें यथार्थ आहे. कारण, तूं निःसार वस्तु आहेस, या करितां सारासारविचार जाणणारे ससार वस्तूबरोबर

तुझें ग्रहण करणार नाहींतच. धान्यांतील धोंड्याप्रमाणें तुला फेंकून देतील.

**मुक्ता**—मी तरी दुसरें काय ह्मणतें? माझेंही तेंच ह्मणणें. तुझ्याशीं स्पर्धा करणें हें मला अगदींच लाजिरवाणें आहे, कारण स्पर्धा समानाशीं योग्य होते. तो भाग तर या ठिकाणीं राहिलाच नाहीं. कां ह्मणशील तर मी मुक्ता आहें आणि अर्थात् तूं बद्ध आहेस. यावरून जें तूं भाषण केलेंस तेंच मला खरें असें दिसून आलें. तुझ्या व माझ्या मध्यें पुष्कळ अंतर आहे. याकरितां तुझ्याशीं स्पर्धा करणें हें अगदींच मला उपहासास कारण होय. याविषयीं एका सिंहाचें चातुर्य कोणा एका पंडितानें वर्णन केलें आहे तें तुला सांगतें 'असमाने समानत्वं भविता कलहे मम। इति मत्वा ध्रुवं मानी मृगात्सिंहः पलायते' ह्मणजे कोणी एके समयीं सिंहास मृगासह कलह करण्याचा प्रसंग दैवयोगानें प्राप्त झाला. त्या वेळीं तो अभिमानी सिंह मनामध्यें असा विचार करिता झाला कीं आपल्याशीं समान नव्हे अशा क्षुल्लक जातीच्या मृगाबरोबर जर म्यां कलह केला तर त्याच्याशीं आपल्यास समानता प्राप्त होईल. याकरतां त्याच्याशीं कसोटा कसणें अगदींच योग्य नाहीं. असा विचार करून तो मानी सिंह झगडा सोडून पळून गेला. यास्तव तुझ्याशीं कलह करणें हें मला मुक्तेला योग्य नाहीं आणि माझ्याशीं जी तूं स्पर्धा धरलेली आहेस ती तुलाही निंदास्पद आहे:—

आर्या ( गीति. )

**हठ सोडुनियां कनका तेंचि करीं युक्त जें विचारातें ।**
**मुक्तीं न साम्य[1] बद्धा नरपतिशीं योग्य जेंवि चोरातें॥२॥**

जीव जसा नानाप्रकारच्या शुक्लोहितकृष्णादि कर्मवासनांहीं बद्ध असतो त्याप्रमाणें तूं नानाप्रकारच्या मलांनीं बद्ध आहेस. कदाचित् शोधक निपुण लोकांनीं पुटें देऊन जरी तुला मलरहित केलें, तथापि अलंकाररूपत्व प्राप्त होण्याबरोबर पुनः मलिनत्व आहेच आहे. अतएव जीव जसा जन्माला येऊन शुभाशुभ कर्में करितो आणि त्या कर्मांनीं बद्ध होऊन पुनः जन्माला येतो, पुनः कर्में करितो, आणि त्या मलानें नित्य बद्ध असतो, तद्वत् तूं नित्य मलानें बद्ध आहेस आणि मी कोणत्याही अलंकाराच्या ठायीं जरी असल्यें तथापि परमात्म्यासारिखी नित्य मुक्त असतें आणि यासाठींच मला मुक्ता असें ह्मणतात. याकरितां हे मूढमते सुवर्णा, मुक्ताची योग्यता कोणीकडे आणि बद्धाची योग्यता कोणीकडे हें तूंच विचार करून पहा, आणि मग माझ्याशीं स्पर्धा कर.

**सुवर्ण**–( कपाळावर हात मारून ) केवढी तरी आत्मस्तुतिही ! मुक्ते, तूं परमात्म्यासारखी नित्य मुक्त आहेस काय? हा कपाळकरंटे, तुला पापिणीला मुक्ताची योग्यता कोठून मिळणार आहे, ती दुझ्या दिशेस देखील आली

---

१ समानत्व. २ सेवकातें.

नसेल, पापिष्ठे, केवळ नाममात्रानें मुक्ता झालीस ह्मणून बंधापासून मुक्त होशील काय? नांवानें जर नामधारकास योग्यता प्राप्त होते, तर धुतऱ्याला कनक असें माझें नांव आहे. ह्मणून माझ्यानें होणारें कार्य तो धुतराही करूं शकेल असें अर्थांत सिद्ध झालें. तसेंच श्री असें लक्ष्मीचें नांव विषाला आहे, ह्मणून लक्ष्मीची योग्यता त्या प्राणहारक विषाला प्राप्त होईल असेंही तुझ्या अभिप्रायावरून झालेंच. असें झालें तर मग परमेश्वराचींही नांवें सर्व मनुष्यमात्राला त्यांच्या आईबापांनीं ठेविलेलीं असतात, अर्थात् ते सगळे परमेश्वरच होतील. केवढी हो ही अनन्वित गोष्ट! हे निर्लज्जे, तूं असा विचार कर कीं नामांत जो अर्थ असतो तो आपण पूर्वीं पराक्रमानें मिळाविला पाहिजे. तरच त्या नामापासून आपल्यास योग्यता प्राप्त होणार आहे. उगीच नाममात्रानें होणार नाहीं. तूं केवळ नांवानें मुक्ता आहेस, परंतु मुक्तता प्राप्त होण्याचें साधन तुझ्याठायीं आहे काय?

श्लोक ( शार्दूलविक्रीडित. )

मोक्षोत्पादक[1] बोध[2] लेशहि तुझ्यामध्यें न तो आढळे
अज्ञानोत्थमहांधकारवितति[3] ज्याच्या प्रकाशें ढळे।
त्वां सत्कर्म न ईशतुष्टिकर तें स्वप्नींहि संपादिलें
कैसें तें तुज लब्ध होइल न जें पूर्वीं सुपात्रीं दिलें ॥४॥

---

१ मोक्षाला उत्पन्न करणारा. २ ज्ञान. ३ अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या मोठ्या अंधकाराचा पसारा.

श्लोक ( अनुष्टुप् )

**कारणावांचुनी कार्य नुपजे वेदवाक्य हें ।**
**मोक्षा कारण जें ज्ञान तें तुला लेशही नसे ॥ ५ ॥**

आतां तूं कदाचित् असें ह्मणशील कीं माझ्याठायीं अन्य कोणत्याही मलाचा मिश्रीभाव नाहीं, यास्तव परमात्मा जसा गुणादिकृत मलाच्या संपर्कावांचून नित्य मुक्त असतो तसीच मीही मुक्ता आहे. तर तुझें बद्धत्व स्पष्ट दिसतें. तुला डोळे नसतील तर माझ्या डोळ्यांनीं तरी पहाः—

श्लोक ( इंद्रवज्रा )

**नाहीं कधीं बंध ह्मणोनि तूतें**
**मुक्ता असें नाम असे जरी तें ।**
**मुग्धे तरी सूत्रनिबद्धता हे**
**मुक्तात्वनाशासचि बोलताहे ॥ ६ ॥**

हे गतलज्जे मुक्ते, विचार करून पहा, तूं बंधनावांचून कधींच असत नाहींस आणि आंत बाहेर समान व परिपूर्ण नव्हेस. अशी असतां परमात्मवस्तूची समानता आपल्याकडेस ओढून आणण्यास तुला लज्जा तरी कशी वाटत नाहीं. असो, आणखी एक तुझ्या मुक्ता या नांवांत प्रकारांतरानें मुक्तत्वाबद्दल मोठाच विरोध येतो. तो गंभीरार्थ असल्यानें त्याचा बोध होण्यास फारच जड आहे, या करितां त्या अर्थाचें नीट मनन करून पहा ह्मणजे आपल्यामध्यें मोक्षाचा गंध सुद्धां नाहीं हें तुझें तुलाच समजेल. अर्थावरचें लक्ष्य सोडून सैरावैरा मात्र धावूं नकोहोः—

आर्या ( गीति· )

मुक्ता जरि तूं मुक्ते अपवर्गवती[1] न होसि हें तत्त्व।
अपवर्गवती जरि तरि मुक्ताशब्दासि ये अनुचितत्व[2]॥७॥

हे नामधारके मुक्ते, या पद्याचा अर्थ आला का तुझ्या लक्ष्यांत ? कीं मी सांगूं ?

**मुक्ता**– ( रोषानें ) तूं काय बोलणारा मोठा बृहस्पतीचा बापच असशील. तुझ्या वाक्याचा अर्थ मला का दुर्बोध होणार आहे ? मी केव्हांच समजल्यें.

**सभ्य**– (पंडितांकडेस वळून) पंडितमहाराज, सुवर्णाच्या वाक्याचा अर्थ मुक्ता समजली, परंतु त्या गंभीर अर्थांत आमचा प्रवेश मुळींच झाला नाहीं. याकरितां चित्तास चैन पडत नाहीं. तुह्मी जर तेवढा अर्थ सांगाल तर मोठेंच आभारी होऊं.

**पंडित**–सांगावें तें काय ? वाक्याचा अभिप्राय असा आहे कीं ही मुक्ता जर आहे तर अपवर्गवती नव्हे, ह्मणजे मुक्ता शब्दांत जो मकार तो पवर्गांतील आहे, यास्तव ही पवर्गवती आहे. अर्थात् अपवर्गवती नसल्यानें अपवर्ग ह्मणजे मोक्ष इला नाहीं. आतां जर तिला अपवर्गवती (मोक्षवती) ह्मणावें तर पवर्गांतील जो मकार तद्रहित झाली असें झालें तर मुक्ता हें नांव असिद्ध ठरेल व इला दुसरेंच नांव ठेवावें लागेल. हाच काय तो अभिप्राय.

---

१. मोक्षवती। अर्थांतरानें पवर्ग ह्मणजे पवर्गांतील जो मकार तेणें रहित· २. अयोग्यत्व·

**सभ्य**—वः! केवढा तरी हा अर्थ गंभीर! आमच्या सारख्यांस हा दुर्बोधच आहे.

**मुक्ता**—( मत्सरानें ) सभ्यांनो, तुह्मी शहाणे असून या क्लिष्ट अर्थाचें काय वर्णन करतां हो? आणि माना डोलवतां? असे अर्थ केले तर भलत्याचें भलतेंच होईल. ( सुवर्णाकडेस वळून ) हे असंबद्धप्रलापिन् सुवर्णा, माझ्या नांवास अर्थच नाहीं काय?

**सुवर्ण**—हां, बरें विचारलेंस. या विचारण्यानें मला फार बरें वाटलें. तुझ्या स्थितीप्रमाणें तुझ्या नांवाचे अर्थ दोन दिसतात.

आर्या ( गीति )

**सार[1]ज्ञांहीं निवडुनि ससारवस्तुव्र[2]जांतुनी मुक्[3]ता ।**
**केलिस निःसार ह्मणुनि नामानें जाहलीस तूं मुक्ता ॥८॥**
**अथवा मिथ्याभूतस्वगुणा वानिशि ह्मणोनियां मुक्ता ।**
**झालिस लज्जेपासुनि साजे यास्तवचि नाम तुज मुक्ता ९**

**मुक्ता**—( कोपानें सकंप होऊन ) अहाहा! काय सुलक्षण अर्थ शोधून काढला! अरे, हें पांडित्य तुला कोणी शिकविलें? कोणी ऐकतील तर विद्वानांच्या कचेरींत तुला पांडित्य करायाला नेतील. मेला तुझ्यापुढें बृहस्पती. मला वाटतें कीं, तुझें पांडित्य ऐकून सरस्वती सुद्धां लाजेल. मूर्खा, लोकप्रिय, पवित्र आणि योग्य अशा माझ्या नांवाचा अर्थ विपरीत करितोस काय? हाय हाय! लोकापवादाचेंही तुला भय नाहीं! तूं मोठाच निरंकुश आहेस. हे अधमा, दुष्टास

---

१ तत्वज्ञांनीं. २ सारयुक्त पदार्थांच्या पंक्तींतून. ३ मोकळी, निराळी.

सगळें विश्वच दुष्ट वाटतें. भ्रांत असलेल्यास सर्व सृष्टि फिरल्यासारिखी वाटते. तद्वतच तुला आपल्या नांवासारखें इतरांचेंही नांव निरर्थक वाटतें. हे आत्मदोषांधा, तूं निरंतर सुवर्ण असें जें नांव धारण करतोस तें तरी तुला योग्य आहे काय? माझ्या मतानें तुला सुवर्ण सोडून कुवर्ण नांव ठेवावें ह्मणजे शोभेल:—

आर्या ( गीति. )

**ह्मणति अभंद्रेसि जशी भद्रा मंगल अमंगला लोकीं।**
**हरिदास उदरदासां तुजहि कुवर्णा सुवर्ण अवलोकीं १०**

हे मिथ्याभिमान्या सुवर्णा, उगीच तीळ घालून कुळ उच्चारण केलेंस! माझ्या यथार्थ नामावर मिथ्यात्वाचा आरोप जर केला नसतास तर तुझ्या नामाची अनर्थकता इतके दिवस झांकण घातल्यासारिखी होती ती प्रकट झाली नसती. अन्याचे सर्षपप्राय लघु दोष जर तूं वर काढलेस तर तुझे पर्वताएवढे दोष झांकले जातील काय? हे दुर्मते, तुला कुवर्ण हेंच नांव योग्य आहे, कारण तूं दुर्वर्णाचें थोरलें भावंड आहेस, मग तुलाच सुवर्ण अशी संज्ञा कशी शोभेल? त्यांत कारणांतरानेंही तुला कुवर्ण ह्मणण्यास आधार दिसतो. कोणता ह्मणशील तर ऐक. कुत्सित वर्णाचा उच्चार करून परांचें हृदय दुखवितोस ह्मणून कुवर्ण नामासच तूं योग्य आहेस; आणि याच दुर्मुखता दोषास्तव तुला—( इतकें अर्धेंच बोलून कानावर हात ठेवते) शिव! शिव! शत्रु जरी असला

---

१ अकल्याण करणारीस. २ रौप्याचें.

तथापि कोणाचें कोणी मर्म काढूं नये ‘ **न कश्चिन्मर्मणि स्पृशेत्** ’ ह्या शास्त्रवचनाचें भय वाटतें. नाहीं तर तुझें आतांच मर्म काढावें असें मनांत होतें आणि तसें केल्यावर या सभेंत तुझी शोभा रहाणार नाहीं.

**सुवर्ण**–( हंसून ) तूं मर्म काढणार तें कसचें आणि तुझ्या बडबडीस तरी भितो कोण? काढ काढ काय काढणार तें, मोठें आडंबर घालून झांकून ठेवूं नको.

**मुक्ता**–तें मी पूर्वींच जाणलें. तुझीं मर्में किती जरी काढलीं, तथापि तुला त्याविषयींचा खेद मुळींच नाहीं. ‘ **मानापमाने समः** ’ या वाक्यांत सांगितलेलें मूर्खत्वलक्षण तुझ्यामध्यें परिपूर्ण भरलेलें आहे. परंतु मलाच पुरवेनासें झाल्यावरून मी अर्धेंच बोलून मुकाट्यानें राहिलें. आतां तुला जर तत्संबंधी खेद नाहीं तर सांगतें. (आपल्याशीं) आज या दुर्वर्णाचा उच्चार करणाऱ्या सुवर्णाचा मुखभंग करितें. (उघड) अरेरे, कुवर्णा, कान फाडून ऐक. सांगतें तुझी कशी काय विपत्ति होते ती. तुला अग्नींत घालून भाजतात, लोहमुद्गरानें झोडतात, कर्तरीनें तोडतात, कसावर घांसतात. अरे पापिष्ठा, अशा यमयातनेसारख्या यातना तुला निरंतर भोगाव्या लागतात, असें पाप तरी तुझें किती खंड्या भरलें आहे तें तुझें तुलाच ठाऊक. तूं कुत्सित शब्दांनीं पराचें हृदय दुखवितोस याकरितांच तुला ह्या यातना भोगाव्या लागतात काय? विचारानें पाहिलें तर एवढ्याच दोषापासून अशा यातना प्राप्त होण्याचा संभव दिसत नाहीं.

मला वाटतें कीं, त्वां पर्वतासारखीं दुरितें जोडलीं असावीं. कशावरून ह्मणशील तर पाप करणाऱ्या मनुष्यमात्रांस यमलोकांत अशाच यातना भोगाव्या लागतात. ते भयंकर यमकिंकर पापकारी मनुष्यांस असेच तप्त तैल कढईंत घालून तळतात, अग्नींत घालून जाळतात, कुठारानें फोडून तुकडे करतात, लोहमुद्गरांनीं झोडतात, आणि असिपत्रावरून ओढतात, इत्यादि बहुतेक प्रकारें उग्र शासनें भोगवितात. त्याचप्रमाणें तुलाहि घर्षण, छेदन, ताप, ताडन, आर्द्रीकरण इत्यादि दुःखें सोसावीं लागतात. जर तुझ्या ठायीं अगणित पाप नसतें तर अशा रीतीचीं दुःखें तुला कां बरें प्राप्त झालीं असतीं? पुण्यावांचून सुख आणि पापावांचून दुःख प्राप्त झालेलें कोणी ऐकिलें आहे काय? यावरून तुझ्या पापाची संख्या नाहीं! तूं दुरिताची खाणीच आहेस! (सभ्यांकडेस) अहो सभासद, तुह्मीही मोठे परीक्षकच आहांत, याकरितां लोहमुखानें याला सच्छिद्र करून तुह्मी तरि याची परीक्षा करा. महाराज, मला हें एक मोठेंच आश्चर्य वाटतें. कोणतें ह्मणाल तर परीक्षार्ह वस्तु बहुत असतात आणि परीक्षक आहेत ते त्या वस्तूंची परीक्षाही नाना प्रकारें करीत असतात; परंतु टोपण्यानें, जाळण्यानें, कापण्यानें, घांसण्यानें, व प्रहारानें परीक्षा करण्याजोगा पदार्थ या सुवर्णावांचून दुसरा आढळला नाहीं, आणि अशा रीतीचें शासन केल्यावांचून या पापिष्ठाची परीक्षाही होणें फारच कठिणः—

श्लोक ( रथोद्धता. )

लोहजा[1] करुनि ईषिका[2] तिणें छिद्र पाडुनि सुतप्ततां[3]गुणें ।
शासिते जरि न यासि जाणते लक्षणा सदसता[4] न जाणते ॥ ११ ॥

श्लोक ( वैतालिय. )

तपनीय[5] ह्मणोनि तापतो मज अत्यंत सुयुक्त वाटतो ।
अपराधकरासि शिक्षण[6] करणें हेंचि सुनीतिलक्षण॥१२॥

(सुवर्णाकडेस वळून) पापमूर्ते हाटका, या प्रकारचे तुला धक्के झपाटे खावे लागतात, लोकांपासून जशी तुझी नित्य दुर्दशा होते, तशी यमलोकांतील पाप्यांची सुद्धां बहुधा होत नसेल. असें असून त्या लज्जेस अंतःकरणांत थोडा सुद्धां अवकाश न देतां या सज्जनसभेंत सर्वांसमक्ष आपल्या वैभवाचें वर्णन करितोस ! तुला आतां सांगावें तरी काय? तुला बोध करण्यापेक्षां सिकता पिळून तेल काढण्याचा यत्न केल्यास बरें, कांहीं तरी फलनिष्पत्ती होईल, परंतु तुला बोध करून अगदींच होणार नाहीं. छिः ! मूर्खा तुझ्या ज्ञानाला धिक्कार असो.

**सुवर्ण**–( कोपावेशानें कंपित होऊन ) परीक्षकहो, ही वारंवार कठोर शब्दांचा उच्चार करणारी मुक्ताराक्षसी तुमच्या पुढें मोठ्या प्रगल्भत्वानें जल्पन करीत आहे. हाय! हाय! या दुष्टेची परीक्षा अद्यापि तुह्मी कां बरें करीत नाहीं. अहो, मी

१ लोखंडापासून झालेली. २ काडी. ३ तापविण्यानें. ४ बरें वाईट. ५ सुवर्ण, अर्थांतरानें तापविण्यास योग्य. ६ शिक्षा.

अन्वर्थनामा सुवर्ण असून मला कुवर्ण शब्दानें पाचारिते अशी प्रतीपभाषिणी तुमच्या या सभ्य समाजांत उभी रहाण्यास तरी योग्य आहे काय? अशा या अमंगलभाषिणीला तुह्मी या सभेंतून पिटाळून कां देत नाहीं? नीतिशास्त्र असें आहे कीं, एकादा कोणी उच्छृंखलपणानें योग्याची अमर्याद जर निंदा करूं लागला तर ज्याला सामर्थ्य असेल त्याणें त्या दुष्टाची जीभच कापावी आणि तसें प्रभुत्व नसल्यास कानांत बोटें घालून उठून जावें. परंतु ते महानिंदापर दुःशब्द ऐकूं नयेत. असें असतां तुह्मी तर कान उघडून ऐकतां, त्या दुष्टेला प्रत्युत्तर देखील देत नाहीं हें एक आश्चर्यच आहे. असो, आतां फार बोलून काय उपयोग? (आपल्याशीं) हे सभ्य कांहींच बोलत नाहींत. न जाणो यानां त्या गणिकेचा पक्षपातही असेल. न बोलोत. यांचें तरी आर्जव करितो कोण? मी आधीं बोलण्यास कोठें कमी आहें. मी एकटाच हजारांकडेस बोलेन आणि आपला पक्षपाती आपण हें तर न्यायप्रसिद्ध आहे. 'आत्मैव ह्यात्मनो मित्रमात्मैव गुरुरात्मनः' याकरितां अन्याचा भरंवसा धरून आपलें कारण होणार नाहीं. आतां या सभासदांपुढें या दुष्टेचें बरेंच मुखभंजन करितों. (उघड) सभासद, या वराकीनें तुमच्या समक्ष आपल्या स्वभावानुरूप माझ्या सद्गुणांचें दोषरूपानें ग्रहण केलें, यावरून मला एका कवीच्या वचनाचें स्मरण झालें 'गुणोऽपि दूषणं दुष्टे सुजने दूषणं गुणः। सर्पे क्षीरं विषं मेघे मधुरं क्षारवार्यपि' दुष्टांच्या मुखांत पोंहोचण्याबरोबर गुण असले तरी ला-

गलेच दोषरूपानें बाहेर निघतात आणि सुजनांच्या मुखांत पोहोंचलेले दोष गुणरूपानें परिणत होऊन सर्व लोकांस उपयुक्त होतात हें एक मोठेंच आश्चर्य. पहा, सर्प हा दुर्जन आहे, याकरितां त्याच्या मुखांत दुग्ध जरी ओतलें तथापि तें तत्क्षणींच दुःसह विष होतें, दुग्धमाधुर्याचा लव सुद्धां त्या ठिकाणीं रहात नसतो, इतकेंच नाहीं तर त्याच्या स्पर्शाबरोबर लोकांचा प्राणांत व्हावा अशीही त्यास उग्रता प्राप्त होते. तसेंच त्या सुजन मेघांच्या मुखांत प्राप्त होणारें क्षारोदक अत्यंत मधुर होऊन सर्व जीवांस जीवन देतें. तस्मात् ही नामधारिणी मुक्ता त्रैलोक्यांत असणाऱ्या दौर्जन्याच्या रसानें ओतविलेली पुतळीच आहे. मग हिच्या अमंगळ मुखांत पोहोंचणारे माझे सद्गुण दोषरूप कसे न होतील? आणि तेणेंकरून सुजन लोकांच्या कानांत कर्णशूल कां बरें उत्पन्न होणार नाहीं? महाराज, या दुर्जन वचनांस एका कवीश्वरानें कालकूट विषाहूनही विशेषता दिलेली आहे. तो त्या कालकूटाप्रत सांगतोः— बाबारे हालाहला, संपूर्ण दारुण पदार्थांमध्यें मीच वरिष्ठ आहें ह्मणून गर्व वागवूं नको. कां असें ह्मणशील तर ऐक. तूं एकटाच आहेस; परंतु तुझ्याहून शतगुणांनीं विशेष अशीं प्रतिक्षणास शतशः दुर्जनमुखापासून दारुण वचनें उत्पन्न होतात. मग त्यांच्यापुढें तुझा एकट्याचा गर्व चालेल काय? यास्तव तूं गर्व सोडून त्या दुर्जनास हात जोडित जा, ह्मणजे तुझा बचाव होईल. त्या कवीचें वचन आज माझ्या प्रत्ययास आलें. अहो, दुर्जनांच्या मुखांतून

एकही श्रोतव्य, वर्णनीय, आणि आल्हादकारक शब्द उत्पन्न होणार नाहीं हा सिद्धांतच आहे. सभ्यांनो, तुह्मीच विचार करून पहा, या दुष्टेच्या मुखापासून जे तापताडनादिक गुण निघाले ते दोषरूपानें निघाले. परंतु या संस्कारांचा बुद्धिपूर्वक जो म्यां स्वीकार केला तो परोपकारार्थच आहे, मग या वराकीनें कपाळकूट केली ह्मणून ते दोष होतील काय? अहो, जसा जगन्नियंता परमेश्वर जन्ममरणादिरूप गौणत्वाचा स्वीकार करून नाना प्रकारचे मत्स्यकच्छादिक अवतार धारण करितो आणि सर्व जीवांवर उपकार करितो तद्वत् मीही ताप, ताडन, छेदन इत्यादि संस्कारांचा स्वीकार करून नाना प्रकारचीं कटककुंडलादिक अलंकाररूपें धारण करितों, आणि सर्व लोकांस शोभवितों. अशा ह्या माझ्या परमेश्वरतुल्य परोपकारार्थ ज्या लीला त्या दोषास योग्य होतील काय? आणि ह्या माझ्यावांचून अन्यास तरी पचतील काय?

आर्या (गीति.)

वैश्वानरांत[1] शिरलों तरि माझें तेज वाढतें निपट[2] ।
या पापेचा भस्मीभावचि होईल हें नव्हे कपट ॥१३॥

श्लोक (वसंततिलका.)

लोहप्रहार मजला जरि तीव्र केला
पावे कधींच न मदंग विकारतेला[3] ।
अंगीं जरी अडखळेलचि तो प्रहार
आकारही न उरवील इचा असार[4] ॥ १४ ॥

१ अग्नींत. २ स्पष्ट. ३ विकारत्वाला. ४ पोकळ.

श्लोक ( उपेंद्रवज्रा· )

विकार[1] भंगे परि जातिभंग
नसे मला शाश्वत हें मदंग[2] ।
जरी घडे छेद[3] तथापि मातें
न रूपविच्छेद[4] सदा समातें[5] ॥ १५ ॥

आर्या ( गीति· )

जातिभ्रंशचि होतो घडतां आघात या[6] वराकेला[7] ।
म्या भ्रष्टेला आश्रय देउनियां घात हा बरा केला ॥१६॥
निजरूपपरिभ्रष्टा मुक्ता ह्मणवूनि आपणाला हे ।
लाजेना दुरितवती ग्रामहरी[8] केंवि हरिपणा[9] लाहे[10] ॥१७॥

श्लोक ( शार्दूलविक्रीडित· )

अग्नीचा घडतांहि संगम न ज्या[11] क्षीणत्व हा निश्चय
अन्यां[12] संग घडे तथापि न कधीं ज्याला स्वरूपक्षय[13] ।
यत्सारूप्यचि[14] पावतो सतत यत्संगें कुधातुव्रज[15]
त्या विद्वत्सुपरीक्षिता[16] निपट[17] हे निंदी सुवर्णा मज ॥१८॥

सभ्यांनो, एवंच लोकसुखार्थ स्वीकारलेल्या ह्या माझ्या साहजिक लीला मला ह्मणूनच पचल्या आणि शोभल्या. या भ्रष्टेची त्याच वेळीं रक्षा झाली असती. अहो, ही वारंवार

---

१ अलंकारत्वादिक· २ माझें अंग· ३ शकलता· ४ रूपापासून निराळेपणा· ५ एकरूपातें· ६ मुक्तेला· ७ नीचेला· ८ कुतरा· ९ सिंहत्वाला· १० लाभे· ११ ज्या सुवर्णास· १२ अन्य ताम्रादि धातूंचा· १३ स्वरूपच्युति· १४ ज्याची समानता· १५ कुत्सित धातूंचा समूह· १६ विद्वानांनीं परीक्षा केलेलें· १७ स्पष्ट.

स्वरूपापासून भ्रष्ट होणारी दुरिताची खाणच आहे यांत संदेह नाहीं. असें असतांना लज्जा सोडून ही मला पुण्यशीलाला पापी ह्मणते. आतां या अधमेला करावें तरी काय? ही आपल्या बरोबर तुमची सुद्धां लज्जा घालवील. यास्तव या दुष्टेला लागलीच या सभेंतून पिटाळून द्या. अहो, जसे साधूच्या संगानें अन्य साधूच होतात आणि अन्याच्या संगानें साधु भ्रष्ट होत नाहीं. तसें माझ्या संगानें ताम्रादि धातु देखील मत्स्वरूपाला प्राप्त होतात आणि त्यांच्या संगानें मी सुवर्णत्वापासून कधींच भ्रष्ट होत नाहीं. तसेंच छेदनाग्निवेशादिक प्रकार जरी मला घडले, तथापि माझी रूपच्युतीही होत नाहीं यावरून मला परमात्म्यासारिखाच नाशरहित ह्मटलें तरी शोभेल. उगीच ही निर्लज्जा केवल नाममात्रानेंच आपण परमात्म्यासारखी नित्यमुक्त आहें ह्मणून मुरगडते. अहो, तुह्मी असें पहा ‘ हरि ’ असें विष्णूचें नांव मंडूकाला, घोड्याला, माकडाला, पोपटाला आणि सर्पाला आहे, ह्मणून ते मंडूकादिक नामधारणानें त्या परमेश्वरासारखे होतील काय? तसेंच ‘ हर ’ असें महादेवाचें नांव चोराला आहे, ह्मणून त्या पार्वतीरमणाची योग्यता त्या नामधारक तस्कराला येईल काय? तो महादेव कोठें आणि बिचारा चोर कोठें! अहो, परमात्म्याची योग्यता रूपापासून भ्रष्ट होऊन नाश पावणाऱ्या त्या ह्या नीच मुक्तेस मिळेल काय? आतां कदाचित् मला जर परमात्म्यासारखा नित्यमुक्त ह्मटलें तर मात्र चालेल. नाहीं सभासद?

**सभ्य**—आह्मी हें तरी होय कसें ह्मणावें ? तूंहि केव्हांना केव्हां मलयुक्त असतोस.

**सुवर्ण**—आत्मा नाहीं का मलिन असत? शाबास! झाली तर तुमच्या विद्वत्तेची परीक्षा! अहो, आत्म्यास ज्या काळीं अविद्यायोगें अहंकाराचा संबंध घडतो त्याच वेळीं त्याला अनात्मरूप अशा देहादिकांच्याठायीं अहंता व पुत्रादिकांच्या ठायीं ममता उत्पन्न होते. एवंच मनःसंगानें नाशवंत विषयांच्या ठायीं तो अनुरक्त होऊन आपण संसारातीत असतांही अशा गौणत्वाला पात्र होतो. जसा शुद्ध स्फटिक आरक्तादि अनेक वर्णांच्या सामीप्यास्तव अनेकवर्ण भासतो तथापि त्या वर्णांपासून पृथक् होण्याबरोबर तो शुद्धच आहे तसा आत्माही संसारधर्मक बुद्धींद्रियादिकांच्या सामीप्यास्तव तादात्म्याध्यासानें संसारी होतो आणि त्याच्याच प्रकाशानें प्रकाशित होणाऱ्या मनासह अविवेकाला प्राप्त होऊन मनःकल्पित विषयांला भोगीत होत्साता अभिमानानें कर्मबद्ध होऊन मलिन होतो, परंतु हें मलिनत्व वास्तविक नव्हे, कल्पित आहे. ज्या वेळीं तो ज्ञानाचा आश्रय करितो त्या वेळीं त्याच ज्ञानाग्नीनें देह, इंद्रियें, मन, प्राण, अहंकार इत्यादिउपाधींचा लय करून त्यांहून पृथक् असणारा नित्य, शुद्ध, बुद्ध, परिपूर्ण, आनंदस्वरूप, अव्यय, आणि स्वयंप्रकाश इत्यादि लक्षणांनीं उपलक्षित असा आपण परब्रह्म आहें असें स्वात्मानुभवानें जाणून स्वस्वरूपीं प्राप्त होतो. तसाच मीहि ज्या वेळीं अन्यसंपर्कानें मलिन होतों त्या वेळीं अग्नींत प्रवेश

करितों आणि सर्व उपाधिमलांचा लय करून स्वस्वरूपाच्याठायीं प्राप्त होतों. जसा ज्ञानाग्नीच्या योगानें उपाधींचाच लय होतो व आत्मा हा नित्यच रहातो, तसा अग्निसंयोगानें माझ्याही उपाधींचा लय होतो व मी नाशरहित अवशिष्ट रहातों. माझा लय कधींच होत नाहीं. अस्तु, हे सभासदांनो आतां तरी खात्री झाली ? कीं अजून संशयच आहे.

**सभ्य**–(विनोदानें हास्य करून) नाहीं, संशय कसचा ? तुझे किती एक आत्म्यासारखे धर्म आहेत खरे.

**सुवर्ण**–( मोठ्या गर्वानें ) होयना ? झाला तर मग निवाडा. सगळे नसेनात, कांहींसे तरी आहेत. ह्या रूपापासून भ्रष्ट होणाऱ्या पापिष्टेकडे एक तरी आत्म्याचा धर्म आहे काय ? नांव मात्र मुक्ता. गुण नाहींत तर मग नांव कशाला जाळायाला पाहिजे ? नांव ठेविलें मदन, परंतु मदनाकडेस पाहिलें तर नासिक गेलें त्र्यंबकास, डोळे गेले पाताळांत, आणि कान गेले वैकुंठास. मग त्या असलेल्या खोट्या नांवाचा काय उपयोग ? असो, तें कांहींका होईना ? त्यांत मला काय, परंतु लोकोपकारार्थ म्यां स्वीकारलेले जे माझे अग्निप्रवेशादिक गुण त्यांच्या ठायीं या दुष्टेनें दोषांचा आरोप केला यावरून मला एवढें बोलावें लागलें. माझ्या लोकपवित्र गुणांचें कसें हो या वराकीनें दोषरूपानें ग्रहण केलें? अहो, या भ्रष्टेचें तोंड सुद्धां पाहूं नये. हिची शहाण्यानें उपेक्षाच केली पाहिजे, कारण अयोग्याशीं विवाद करणें हें योग्यास अगदींच अयुक्त आहे.

**‘विवादश्च विवाहश्च समयोरेव युज्यते’** अशी नीति आहे. विवाद आणि विवाह हे समानाशींच शोभतात, यास्तव या भ्रष्टेशीं भाषण बंद करून मौन धारण करणें हेंच या वेळीं युक्त आहे. (असें बोलून निःशब्द रहातो.)

**मुक्ता**–(मत्सरयुक्त होऊन) रेरे कार्तस्वरा, मौनमुद्रा धारण केलीस काय? शाबास! वाहवा! युक्ति तर बरीच आहे, **‘मौनं सर्वार्थसाधनं’** हेंच मौन तुला फार उपयोगी होईल. माझ्यापुढें बोलून पक्ष सिद्ध करणें हें तर दुर्घटच आहे. उगीच वांकडेंतिकडें बोलून सभासदांच्या कानास वीट आणला असतास तें मात्र नाहींसें झालें. आतां इलाज नाहीं ह्मणून मौन धरावें लागलें असें ह्मण. पुनः आणखी डौलानें योग्यता वाखाणूं नको. तुझी आणि माझी योग्यता झांकलेली नाहीं. ती क्रयविक्रयाच्या वेळीं स्पष्ट होते. तुला विस्मृती झाली असेल तर आठवण करितेः—

श्लोक (स्रग्धरा वृत्त.)

**भर्मा[1] तूं निंद्यकर्मा बडबडसि वृथा नेणुनी न्यायधर्मा**
**गर्वा सोडूनि सर्वा अजुनि तरि विचारीं मनीं आत्ममर्मा[2]।**
**या लोकां मुक्तशोकां[3]प्रति तरि करिं हा प्रश्न जे सन्मतानें[4]**
**एकीतें गोलिकेतें[5] मिळविति तुझिया मूल्यमुद्राशतानें[6] १९**

पहा, सुवर्णा, सुधेतुल्य तेजःपुंज आणि अमूल्य अशा

१ हे सुवर्णा. २ आपली कळ. ३ शोकरहित ह्मणजे सुखी त्यांप्रत. ४ शहाण्याच्या मतानें ५ गोलिका ह्मणजे मौक्तिकाची गोळी, दाणा. ६ मोलाविषयीं ज्या मुद्रा ह्मणजे मोहोरा त्यांच्या शेंकड्यानें.

माझ्या गुलिका पाहून भोगी पुरुष असे थक्क होऊन जातात कीं त्यांनां देहस्मृति सुद्धां रहात नाहीं. जसे भगवद्भक्त भगवंताची सगुणमूर्ति पहाण्याबरोबर मोठेच उत्कंठेनें तत्स्वरूपांत निमग्न होऊन जातात, तसे रसिक विलासी पुरुष माझ्या स्वरूपास अगदींच लुब्ध होऊन जातात; आणि मग त्यावेळीं सुवर्णाच्या मोहोरा मोलाकरितां कितीहि जरी द्याव्या लागल्या तथापि ते दिल्यावांचून रहात नाहींत. त्यांनां त्या गुलिकेपुढें मोहोरा ह्मटल्या ह्मणजे अतितुच्छ वाटतात. या प्रत्ययावरून तुझ्या व माझ्यामध्यें किती अंतर आहे हें तूंच विचार करून पहा ह्मणजे झालें. अरे, ज्ञानहीना कनका, ज्या वेळीं माझ्या एकेक गुलिकेपुढें तुझ्या शेंकडोशें मोहोरा गुणज्ञलोक ओंवाळून टाकतात. त्या वेळीं तुझी योग्यता तुला समजली नाहीं काय? बरें तें एक असो, आणखी एक तुला विचारावयाचें आहे:—

श्लोक ( शिखरिणी. )

पहा त्वत्पक्षीय[1] त्रैपुरजतताम्रायसमुख[2]-
प्रभेनें मौल्यें ही लघु ह्मणुनि जे होति विमुख।
पहा माझे गारुत्मत[3]-कुलिशों[4]-नीलादि सकल
स्वतेजें धातूंतें प्रबलचि करायासि विकल[5] ॥२०॥

हे योग्यायोग्यविचारहीना हाटका, ऐकिलेंसना माझें भाषण? आधीं हीं तुझीं लोहकथिलादिक भावंडें पहा, आणि

१ तुझे पक्षपाती. २ कथिल रौप्य तांबें लोखंड. ३ गरुडपाच. ४ वज्र. ५ निस्तेज.

माझींही वज्रवैदूर्यादिक पहा. तसेंच किंचित् तुमच्या आमच्या मोलाकडेसही लक्ष्य दे, आणि मग आपला वरिष्ठपणा वाखाण. अरे, हा निवाडा आंधळासुद्धां करील आणि तुझ्याही मनांत आलाच असेल. हां समजलें, याचकरितां तूं मुकाट्यानें रहाण्याची प्रतिज्ञा केलीस वाटतें. हें फार चांगलें झालें. आतां मात्र माझ्यापुढें थोरपणाचा डौल घालूं नको.

**सुवर्ण**–( कोपानें कंपित होऊन रजताप्रत ) वत्सा रजता, मी कांहीं आतां या अधमेच्या तोंडास लागणार नाहीं, तुमच्यानें जर कांहीं बोलवेल तर बोला.

**रजत**–( हात जोडून ) महाराज, आह्मी तुमचे किंकर जवळ असतां कां बरें तुह्मी या अधमेच्या तोंडीं लागतां? ही मोठीच तोंडाळ आहे, परंतु या दुष्टेचा मद मी आतांच उतरतों, आपण स्वस्थ बसून मौज पहावी.

**सभ्य**–( विनोदानें ) पंडित महाराज, पुढें बरीच मजा आहे, आतां स्वर्णपक्षीय धातूंचा आणि मुक्तापक्षीय रत्नांचा विवाद होईल वाटतें.

**पंडित**–होय, तो आतां व्हावयाचाच आणि यांत मोठीच मौज आहे.

**सभ्य**–मौज पर किती मौज ह्मणून सांगूं? तिकडचें चित्तच ढळेना. ज्याचें ऐकावें त्याचाच पक्ष खरासा वाटतो. असो, आमची आणखी त्यांत गडबड कशाला? मुकाट्यानें ऐकावें हेंच खरें.

( सर्व तटस्थ होऊन ऐकतात इतक्यांत रजत मोठ्या त्वेषानें मुक्तेपुढें येतो. )

**रजत**–( कोपाविष्ट होऊन ) अहो महाराज, हे सभासद लोकहो, ही नीच मुक्ता तुमच्या समक्ष आमच्या कुलांत अवतंस असा जो सुवर्णनामक आमचा बंधु त्याची अमर्याद निंदा करते तर या दुष्टेला आपण कां बरें वारीत नाहीं? महाराज, यांत वक्ताच दोषी होतो असें समजूं नये. '**शृणोति तस्मादपि यः स पापभाक्**' ह्मणजे अनन्वित जल्पकांचीं दुष्टभाषणें जो ऐकणारा तोही दोषी होतो असें धर्मशास्त्र आहे. यास्तव आपण या अधमेच्या भाषणाची उपेक्षा करूं नये. अहो, आपल्या मौल्याची विशेषता दाखवून या अविचारिणीनें एकंदर धातुवर्ग तोंडानें तुच्छ करून सोडला, परंतु या गणिकेनें प्राण दिला ह्मणून ते धातु श्रेष्ठत्वानें उणे होतील काय? सभ्यांनो, तुह्मी असें पहा कीं गाईला मौल्य कमी असतें आणि अश्वगजादिकांला अधिक असतें. ह्मणून त्या गायत्रीहून ते अश्वगजादिक पशु श्रेष्ठ मानितां येतील काय? अहो, ज्या धेनूच्या शरीरांत चतुर्दश भुवनें वास करितात, जिच्या दानानें पृथ्वीदानाचें फल प्राप्त होतें, मुख्यवर्ण ब्राह्मण जिची नित्यशः उपासना करतात, जिच्या पंचगव्यानें त्वगस्थिगत पापांचा विलय होतो, जिच्या दधि, दुग्ध, आज्य इत्यादिक हविर्द्रव्यानें यज्ञ, याग, अग्निहोत्र इत्यादि कर्में होतात, ती धेनु कमी मोलानें मिळते ह्मणून तुच्छ मानिली जाईल काय? तसें मानलें तर मोठाच अधर्म होईल. ह्मणून श्रेष्ठत्वाचा ठराव ह्मटला ह्मणजे मौल्यावर मुळींच नाहीं असें तत्त्ववेत्त्यांनीं सिद्ध केलेंच आहे. असें अ-

सतां ही निर्लज्जा वारंवार आपलाच बडिवार वाखाणते, परंतु या मूर्खेला सुवर्णापुढें विचारतो कोण? मी आधीं कुठें या नीचेला जुमानतों:—

आर्या ( गीति· )

**दूर असो कनककथा प्रभु तो होईल मान्य सर्वांतें ।**
**मीच पुरे झाडाया या मुक्तेच्या समूल गर्वातें ॥ २१ ॥**
**मरकत[1] हीरे[2] हरिन्मणि[3] वैदूर्यप्रभृति दगड हे सर्व ।**
**मी वसति करिन तेथें मुक्तेसह लटकताति हतगर्व २२**

सभ्यमहाराज, हें मी खोटें सांगत असेन तर या गोष्टीचा अनुभव तुह्मांला सुद्धां असेलच. मी असेन त्या ठिकाणीं या मुक्तादिरत्नांच्या राशि कोनपव्यांत देखील पडलेल्या असतात. याकरितां या एकंदर रत्नांची स्थिति माझ्या आधीनच आहे. आणणें, नेणें, पालन करणें, इत्यादिप्रकारांचा मुखत्यार मीच आहें. मी पाहिजे त्या ठिकाणीं यांनां पकडून नेतों आणि हींही बिचारीं हात बांधून जातात, मग माझ्यापुढें यांची योग्यता कोठें राहिली? या अनुभवावरून मी यांचा स्वामी आणि हे माझे किंकर हें स्पष्टच सिद्ध झालें. असें असून ही मुक्ता माझ्याही स्वामीबरोबर स्पर्धा करण्यास वारंवार सिद्ध होते. आतां या अधमेस करावें तरी काय?

**मुक्ता**—( मत्सरयुक्त होऊन ) वाहवारे वाहवा! पूर्वीचा नपुंसक बडबड करून करून दमला आणि तूं दुसरा नपुंसक वचनारंभास पुढारी झालास काय? शाबास! आतां

---

१ माणिक्य· २ हिरा· ३ पाच·

तूंच काय पाहिजे तें बोल. मी तुझ्याशीं विवाद करण्यास कंबर बांधली तर सर्व लोक आणि हीं माझींच वज्रादिक भावंडें मला हंसतील.

( इतक्यांत लोह डोळे लाल करून मोठ्या धिट्टाईनें मुक्तेपुढें उभा रहातो )

**लोह**—( आवेशानें इकडे तिकडे फिरून ) आ:! पापिष्ठे मुक्ते, रजताशीं भाषण केलें तर तुला हंसतील? मतिमंदे, त्या शिवनेत्रापासून उत्पन्न झालेल्या रजताहून तुझा महिमा विशेष आहे काय? हा दुष्टे निर्लज्जे, अगे, त्या स्वर्णरौप्याचें महत्त्व असूं द्या एका बाजूस, माझी तरि योग्यता तुझ्या कपाळीं आहे काय? मी त्यांचेंच शेवटचें भावंड आहें. मला लोह असें ह्मणतात, माझी योग्यता तुला ठाऊक नाहीं काय? ( सभ्यांकडेस ) सभ्यांनो, माझ्या वर्णनाकडेस जरासें लक्ष्य पुरवा:—

श्लोक ( शार्दूलविक्रीडित. )

यच्छस्त्रास्त्रबलेंकरूनि[1] करगा[2] सर्वा मही होतसे
होती हस्तग साप्तशत्रुनृप[3] ते तत्कोश[4] ही हो तसे ।
जो वीरप्रवरक्ष्मापतिकरीं[5] नित्योत्सवें राजतो[6]
तो हा लोह अरातिसागरमहासेतु[7] स्वयें साजतो ॥२३॥

---

१ ज्या लोहापासून झालेल्या शस्त्रास्त्रांच्या बलेंकरून. २ हस्तगत. ३ आप्तांसह शत्रु राजे. ४ त्यांचे कोश. ५ वीरश्रेष्ठ असा जो पृथ्वीपति त्याच्या हातीं. ६ शोभतो. ७ शत्रुसमुद्राचा सेतु.

श्लोक ( उपेंद्रवज्रा· )

कुठा[1]र कु[2]दाल ख[3]नित्र दा[4]त्रें मु[5]खें ह[6]लांचीं मुसलें ल[7]वित्रें ।
मर्द[8]गजें हीं जन[9]तेसि नित्य सुजीवना देति न हें असत्य ॥ २४ ॥

आर्या ( गीति· )

होऊनि शस्त्र हर्षावें जय देउनि मी नृलोकपा[10]ळाला ।
तें मद्यश या दगडां न मिळे जरि फोडिलें कपाळाला ॥ २५ ॥

सभ्यांनो, या पाषाणाचा समूह मरून पुनरेव जरी जन्मास आला तथापि माझा थोरपणा या नीचांला मिळेल काय? खरेंच सांगा बरें, तोंडापुरतें मात्र बोलूं नका.

**सभ्य**—( हंसून ) यांत आह्मी आणखी काय विशेष सांगावें? तुझी आणि त्या रत्नांची योग्यता उघडीच आहे.

**लोह**—( फार चिडून ) अहह! तुह्मीही त्यांच्या रूपाला पाहून भुललेत वाटतें. अहो, शहाण्यांनो, ईश्वरानें बुद्धि दिल्याप्रमाणें, कांहीं तरी विचार करा. उगीच बहिर्दृष्टीनें त्यांच्याच भरीं भरूं नका. अहो, तुह्मी असें पहा, या पृथ्वीला ( रत्नप्रसू ) असें ह्मणतात ती रत्नाप्रत प्रसवणारी संपूर्ण पृथ्वी राजांनीं माझ्याच कृपेनें मिळविलेली आहे. तसेंच

---

१ कुऱ्हाड· २ कुदळ· ३ खोरें· ४ विळा· ५ फाळ· ६ नांगरांचीं· ७ कोयता· ८ माझ्या देहापासून झालेलीं· ९ जनसमूहास· १० राजाला·

देव, दैत्य आणि मानव यांच्यामध्यें असणारे राजे माझ्याच सहायानें शत्रुनाश करून महत्त्वास प्राप्त झाले. ते कदाचित् रत्नावांचून निरंतर राहूं शकतील, परंतु माझ्या आश्रयावांचून क्षणमात्र सुद्धां राहूं शकणार नाहींत. पहा, पांडवांनीं वनवासप्रसंगीं वल्कलें धारण करून रत्नांचा त्याग केला, परंतु माझ्या शस्त्रास्त्रांचा केला काय? तसेंच दाशरथी रामलक्ष्मण वनवासकालीं सर्वस्वाचा त्याग करून गेले, परंतु त्या परमेश्वराच्यानेंही माझ्यावांचून रहावलें नाहीं. मी केवळ थोरांचाच निर्वाह करितों आणि गरीबांकडेस या मुक्तादिरत्नांसारखा ढुंकून सुद्धां पहात नाहीं असें होणार नाहीं. मी परमेश्वरतुल्य सर्व ठिकाणीं समानत्वें दया करणारा आहें. खणणें, नांगरणें, फोडणें, कापणें, आणि चिरणें इत्यादि लोकांचीं कार्यें जर म्यां कृपेनें पतकरलीं नसतीं तर हा संपूर्ण ब्रह्मांडांतील लोकव्यवहार कसा सिद्धीस गेला असता आणि या लोकांचें पोषण तरी कसें झालें असतें? सभ्यांनो, काय समजतां तुह्मी, हा धातुवर्ग क्षणमात्र देखील उपेक्षा करील तर तत्क्षणींच या जगाचा लय होईल, आणि या रत्नसमूहाचें नांव सुद्धां न रहातां नाश जरी झाला तथापि लोककार्यें काय अडणार आहेत? सभासदांनो, खरेंच सांगा, माझ्यावांचून लोकांचीं कार्यें स्वल्प तरी होतील काय?

**सभ्य**—( चकित झाल्यासारखे होऊन ) नाहीं होणार.

**लोह**—( गर्वावेशानें ) आतां बरें बेंबीच्या देंटापासून

देव, दैत्य आणि मानव यांच्यामध्यें असणारे राजे माझ्याच सहायानें शत्रुनाश करून महत्त्वास प्राप्त झाले. ते कदाचित् रत्नावांचून निरंतर राहूं शकतील, परंतु माझ्या आश्रयावांचून क्षणमात्र सुद्धां राहूं शकणार नाहींत. पहा, पांडवांनीं वनवासप्रसंगीं वल्कलें धारण करून रत्नांचा त्याग केला, परंतु माझ्या शस्त्रास्त्रांचा केला काय? तसेंच दाशरथी रामलक्ष्मण वनवासकालीं सर्वस्वाचा त्याग करून गेले, परंतु त्या परमेश्वराच्यानेंही माझ्यावांचून रहावलें नाहीं. मी केवळ थोरांचाच निर्वाह करितों आणि गरीबांकडेस या मुक्तादिरत्नांसारखा ढुंकून सुद्धां पहात नाहीं असें होणार नाहीं. मी परमेश्वरतुल्य सर्व ठिकाणीं समानत्वें दया करणारा आहें. खणणें, नांगरणें, फोडणें, कापणें, आणि चिरणें इत्यादि लोकांचीं कार्यें जर म्यां कृपेनें पतकरलीं नसतीं तर हा संपूर्ण ब्रह्मांडांतील लोकव्यवहार कसा सिद्धीस गेला असता आणि या लोकांचें पोषण तरी कसें झालें असतें? सभ्यांनो, काय समजतां तुह्मी, हा धातुवर्ग क्षणमात्र देखील उपेक्षा करील तर तत्क्षणींच या जगाचा लय होईल, आणि या रत्नसमूहाचें नांव सुद्धां न रहातां नाश जरी झाला तथापि लोककार्यें काय अडणार आहेत? सभासदांनो, खरेंच सांगा, माझ्यावांचून लोकांचीं कार्यें स्वल्प तरी होतील काय?

**सभ्य**–( चकित झाल्यासारखे होऊन ) नाहीं होणार.

**लोह**–( गर्वावेशानें ) आतां बरें बेंबीच्या देंटापासून

नाहीं होणार असें आलें? मघाशीं काय झालें होतें? मुक्ता येऊन जिव्हेवर बसली होती वाटतें? अहो, तुह्मी शास्त्रज्ञ असून तत्त्वविचार केल्यावांचून बोलतां, परंतु हें मुक्तेलाच शोभेल, कारण ती निःसार आहे, तुह्मी सारासार जाणणारे तुह्माला हो हा विचार कसा शोभेल?

**सभ्य**–( सभय होऊन ) हे कालायसा, व्यर्थ आमच्या-वर कां दोषाचा आरोप करतोस? तुझी आणि रत्नाची यो-ग्यता उघडीच आहे ) हेंच आह्मी ह्मटलें ना? यांत को-णता बरें अविचार झाला? तुला आह्मी तुच्छ ह्मटलें काय?

**लोह**–( रोषानें ) अहो, मी समजलों. मी काय वेडा आहें? तुह्मी मात्र आपल्यावर लागू करून घेत नाहीं, परंतु तुमच्या भाषणांत कृत्रिम होतें तें म्या तेव्हांच जाणलें ह्मणून एवढा भाषणाचा विस्तार करून तुमच्या मनाची खात्री केली. असो, आतां मुक्तेकडेसच वळूं. हे विचारशून्ये मुक्ते, मी सुवर्णाचें शेवटलें भावंड आहें. पूर्वी माझी योग्यता पहा आणि माझ्यापुढें तूं किती तुच्छ आहेस तें पहा आणि नं-तर आमच्या राजाकडेस झगडा लावण्यास उद्युक्त हो.

**मुक्ता**–( रजत आणि लोह यांच्या मर्मभेदक भाष-णांनीं खिन्न होऊन मोठ्या दुःखानें स्वपक्षीयांप्रत ह्मणते. )

श्लोक ( वसंततिलका. )

**हे विद्रुमा[१] स्फटिक हीरक पद्मरागा[२]**
**गोमेदका प्रथितमारकता[३] सुरागा[४] ।**

---

१ प्रवाल. २ माणिक्य. ३ पाच ४ उत्तमवर्णी.

वैदूर्य नील जगमान्य अशां तुह्मां हा
निंदी कुधातुगण[1] दुर्वचनें अहाहा ॥ २६ ॥

हे अमूल्य रत्नांनो, तुह्मी या त्रैलोक्यांत सर्वांला वर्णनीय असून हे रजतलोहादिक कुत्सितधातु हृदयभेदक दुर्वचनांनीं तुह्मांला तुच्छ करितात हें माझ्यानें अगदींच सहन करवेना. आतां मी काय करूं? अरे तुह्मांला हें कसें सह्य झालें?

( असें बोलून निस्तेज होते इतक्यांत हीरक पुढें येऊन मुक्तेचें सांत्वन करितो )

**हीरक**—हे शशांकसहोदरि भगवति मुक्ते, एवढी कां खिन्न झालीस? हे सद्गुणतरंगिणि अस्मद्भगिनि, त्या कुधातुगणाच्या वाग्वज्रानें तुझा धैर्यद्रुम खचला काय?

**मुक्ता**—( सुसकारा सोडून ) हे गुणालया बंधो, तुला काय सांगूं? सुवर्णाच्या बोलण्यानें मला मुळींच खेद उत्पन्न झाला नव्हता, परंतु रजताच्या आणि या लोहाच्या भाषणांनीं माझा हृदयभेदच झाला. अरे, लोखंड ह्मणजे किती तुच्छ पदार्थ, जो केरकचऱ्यांत सुद्धां पडलेला असतो अशा कडेलोट पदार्थानें ज्याला मोलच नाहीं अशा एकंदर रत्न समूहाला या सभेंत तुच्छ करावें काय? हाय हाय!

**हीरक**—छिः! मुक्ते, काय हा अविचार घेऊन बसलीस? अगे, लोखंड ह्मणजे पदार्थ काय आहे आणि तूं एवढी शहाणी असून खिन्न होतेस ती काय? पहा, हे कमलाक्षसे, या सृष्टींत जो जो महत्त्वाचा पदार्थ आहे त्यास रत्नाची

१ निंद्य धातुवर्ग.

उपमा देतात. पुरुषांत जो श्रेष्ठ त्यास पुरुषरत्न ह्मणतात, स्त्रियांमध्यें जी श्रेष्ठ तिला स्त्रीरत्न ह्मणतात, त्याच प्रमाणें विद्वद्रत्न, नरवैदूर्य, वीरहीर इत्यादि उपमा सर्वत्र पंडितांच्या मुखापासून निघालेल्या आमच्या श्रेष्ठत्वाची साक्षी देतात, असें असतां आपल्या जातींत सुद्धां तुच्छ अशा यत्किंचित् लोहाच्या निंदेनें हा रत्नसमुदाय निकृष्ट होईल काय? मी तर या मातींत उत्पन्न झालेल्या धातुगणास गणीत सुद्धां नाहीं:—

आर्या ( गीति· )

या धातुगणीं गणितों कांहीं स्वर्णास मी न रौप्याला ।
कलह कराया लोहाद्यल्पीं[1] वद कोण गे सुरा प्याला॥२७॥

मुक्ते, तुला खरेंच सांगतों, या सुवर्णावांचून इतर धातूंशीं संभाषण करण्यास मला मोठीच लज्जा वाटते. त्यांत या हिंसा करणाऱ्या लोहाशीं तर मुळींच बोलणार नाहीं. आतां हा रजतही मला संभाषणीय नव्हे, परंतु, दगडाहून वीट मऊ या न्यायानें हा लोहाहून कांहीं उजवा आहे. याकरितां प्रसंगानुसार या दुर्वर्णाचा उच्चार करणाऱ्या रजताचे आतांच दांत पाडतों. ( रजताकडेस वळून ) अरे मंदबुद्धे रौप्या, तुला दुर्वर्ण आणि रजत अशीं दोनही नांवें फारच शोभतात, कशावरून ह्मणशील तर ऐक. तुझ्या दुर्वर्ण या नांवांत मुखास दुः असा शब्द आहे ह्मणून तूं दुर्मुख झालास आणि रजत या नावांत र हा वर्ण मुखास आहे यावरून मुखर झालास. त्याच प्रमाणें तूंही दुर्मुख

१ लोहादितुच्छधातूंचाठायीं.

ह्मणजे वाईट तोंडाचा आणि मुखर ह्मणजे वाचाळ आहेस खरा. हीं नांवें तुझे गुण पाहून कोणी शहाण्यानें ठेविलीं असतील. वाहवा! नांवासारखे गुण असले ह्मणजे शोभतात. घरांतून बाहेर जातेवेळीं एकादा मुखर किंवा दुर्मुख जर दृष्टीस पडला तर कार्यसिद्धि होत नाहीं, विपत्ति मात्र होते. शाबास! केवढा पराक्रम तुझा!

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित. )

दुर्वर्णा मुखरा खला तुजसवें बोलावयाला मला
लज्जा वाटतसे तुझ्या निरखितां संख्योत्तराला[1] मला[2] ।
जो उन्मत्तगजेंद्रगंडमथनप्रोद्दामशूराग्रणी[3]
तो कंठीरव[4] फेरुशीं[5] करिल कीं हुंकारधी[6] वाग्रणीं[7] ॥२८॥

मूर्खा, तूं दोषांचा समुदाय आहेस. यास्तव तुझ्याशीं संभाषण करण्यास माझ्या मनाला उत्साहच होत नाहीं. मी आतां एवढ्यानेंच आटोपतें घेतों. ( मुक्तेकडेस वळून ) हे गुणसरिते मुक्ते, माझ्या वचनाकडेस लक्ष दे:—

श्लोक (पृथ्वी वृत्त.)

न खेद करिं अंतरीं रुचिरगात्रि[8] अस्मत्स्वसे[9]
न धातु गणनीय हे मणिसं[10] वित्तपा[11] निःस्वसे[12] ।

---

१ संख्येच्या पुढें जाणारा ह्म० असंख्य. २ दोषाला. ३ मदोन्मत्त गजपतीचें गंडस्थल फोडण्याविषयीं शूर. ४ सिंह. ५ मृगाशीं. ६ अहंकारबुद्धि. ७ वाग्युद्धांत. ८ सुंदरांगि. ९ आमचे भगिनी. १० रत्नास. ११ कुबेरास. १२ दरिद्र्यांसारखे.

अमूल्यमणि एक एकचि सुवर्णमुद्राशता[1]
हरील न च तेथ लोहरजतादिकां ईशता[2] ॥ २९ ॥

**रजत**–( उपहासयुक्त होऊन सुवर्णाप्रत ) भोः स्वामिन्, ऐकिलें काय आपण या अल्प पाषाणाचें धृष्टत्व! पूर्वी आह्मी ही मुक्ताच ज्ञानशून्य आहे असें समजत होतें, परंतु हे सगळेच त्या रीतींचे आहेत.

**सुवर्ण**–( हंसून ) अरे, दगडच्च ते, मग ज्ञान नसलें ह्मणून आश्चर्य कोणतें? एकादा कोणी तरी मतिमंद असला तर त्याला शहाणे लोक 'काय रे हा दगड' असें ह्मणतात. हे तर त्याच जातींतले खरे दगड. यांला रे ज्ञान कोठचें असणार आहे? यांपाशीं मणगट घांसून कातडीं मात्र निघतील. यावांचून दुसरा फायदा कोणताच होणार नाहीं.

**रजत**–( मान डोलवून ) खरें महाराज, हें मात्र माझ्या पथ्यावर पडलें. परंतु या हीरकानें माझ्यावर एक नसताच दोष ओढून आणून टेंकला, त्याचें निराकरण केल्यावांचून माझ्यानें रहावणार नाहीं. याकरितां तेवढें बोलतों ह्मणजे बस आहे. ( हीरकाकडेस वळून ) अरे मतिमंदा पाषाणा, कसारे दुर्मुख मुखर अशा अपशकुनकारक शब्दांनीं दुष्टा मला दूषित करतोस? हे विरुद्धजल्पका माझें दर्शन अपशकुनकारक आहे काय? अरे, सर्व विचारी पुरुष माझ्या दर्शनास[3] अंतराय नसावा ह्मणून चांगला शकुन पाहून प्रयाण करितात, आणि मूर्खा तूं प्रत्यक्ष माझ्याच दर्शनानें

१ सुवर्णमोहोरांच्या शेकड्यास. २ सामर्थ्य. ३ प्राप्तीस.

लोकांस अपशकुन होईल ह्मणतोस. आतां तुला पाषाणाला ग्यां दृष्टांत तरी दुसरा कोणता द्यावा सांग बरें? आतां माझ्या दुर्वर्ण या नांवांत आरंभीं दुः आणि रजत या नांवांत आरंभीं र असे वर्ण आहेत, एवढ्यानेंच जर तूं मला दुर्मुख आणि मुखर ह्मणतोस तर या ओढून काढलेल्या अर्थाचा कसा अनर्थ होतो तो पहाः—

आर्या (गीति·)

दुःशब्द रेफ[1]योगें दुर्मुखता ये जरी मुखरताही ।
तरि दुर्मुखीच दुर्गा मुखरा झाली रमा सुखरता[2] ही॥२०॥

छिः! मूर्खा, तुझ्या अर्थाला धिक्कार असो! भलतेच अर्थ करून योग्यांची निंदा करण्यास ज्याला कांहींच संकोच वाटत नाहीं तशांकडेस संभाषण करूं नये हें खरें, आणि आमच्या स्वामींचेंही मत तसेंच आहे (असें बोलून निःशब्द रहातो). (इतक्यांत ताम्रधातु हीरकासमोर प्राप्त होतो).

**ताम्र**—(रागानें) हे वृथा अभिमान धारण करणाऱ्या हीरका, तुह्मांला सुवर्णानें आश्रय दिला आणि त्याच्याच योगानें जी योग्यता प्राप्त झाली ती, निर्लज्जांनो, त्याच सुवर्णापुढें वाखाणून दाखवितां काय? मूर्खांनो, राजाच्या कृपेनें प्राप्त झालेल्या अधिकाराचा डौल राजापुढेंच दाखविणाऱ्या सेवकाप्रमाणें तुह्मी अधिकारभ्रष्ट व्हाल. अरे, तुमच्यावांचून आमचें कार्य बिलकुल अडत नाहीं. तुह्मांला मात्र आमच्या सुवर्णावांचून अन्य गति नाहींः—

१ रकार. २ सुखाशीं रत.

श्लोक. ( शिखरिणी· )

दिसे हें वैषम्य प्रथम मज दोघांत बघतां
सुवर्णावांचोनी न लवहि तुझांतें रुचिरता[1] ।
मणीतें टाकोनि प्रथितें[2] नग सौवर्ण[3] असती
सुपात्रें धातूंचीं धनिक सदनीं फार वसती ॥ ३१ ॥

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित· )

रे वज्रा न वदें वृथा दगडची तूं ज्ञान कैंचें तुला
जाणे कोण तुझांसि जातिगुणतत्त्वानें कधीं हें मला ।
धातूंतें जन जाणती सकळही आराजगोपाल[4] ते
ज्यां लोकव्यवहार योग्य ह्मणुनी सत्कारिती जाणते ३२

( ताम्रधातूचें भाषण ऐकून पद्मराग पुढारी होतो. )

**पद्मराग**–( आवेशानें ) अरे, हे अविचारहृदया ताम्रधातो, मलाही तुझ्याशीं भाषण करण्यास फारच संकट वाटतें, परंतु एकच गोष्ट बोलावयाची आहे ती बोलल्यावांचून जीवाला चैन पडणार नाहीं ह्मणून पुढें झालों. एवढ्यानें लघुत्व आलें तर येऊं द्या. अरे, सुरापान केलेल्या म्लेच्छाप्रमाणें तुझें मुख बरळत असतें यावरून म्लेच्छमुख असें जें तुला नांव आहे त्याची अन्वर्थता प्रकट दिसून आली. मूर्खा, तुझ्या जिव्हेला हाडच नाहीं काय? अरे, तुझा ( धातूंला ) राजापासून गोरक्षकापर्यंत सर्व लोक जाणतात आणि आह्मांला ( रत्नांला ) भाग्यवान् आहेत तेच ओळखि-

---

१ सुंदरपणा· २ प्रख्यात· ३ सुवर्णाचे· ४ गोरक्षकापासून राजापर्यंत·

तात. गरीब लोक आमच्याकडेस वांकड्या डोळ्यांनीं सुद्धां पाहूं शकत नाहींत, असें जर तूं ह्मणतोस तर ऐक. त्या कपाळकरंट्यांनीं आह्मांस न ओळखिलें ह्मणून आमचा कोणता तोटा झाला बरें? तेवढ्यानेंच आह्मीं तुच्छ झालों काय? अरे लोखंडाच्या वडील भावंडा, ताम्रका, तुला एकच विचारतों. महान् पंडित जे आहेत त्यांच्या पांडित्याची ओळख मतिमंदाला नसते ह्मणून त्या लोकवंद्य पंडिताचा तोटा होईल काय? तसेंच दिवाभीत सूर्याचें अवलोकनसुद्धां करूं शकत नाहीं ह्मणून सूर्याचीं कामें अडलीं काय?

श्लोक (शार्दूलविक्रीडित.)

रत्नांची हतभाग्य नेणति जरि स्वप्नांतरीही कथा
त्याचें काय गमावलें वद असे ती काय रत्नां व्यथा।
गंधें लंपट भृंग[1] होउनि रसास्वादार्थ[2] ज्या[3] लक्षिती
त्यातें दर्दुर[4] जाणती न परि ती पद्मांसि[5] नाहीं क्षिती[6] २२

(सुवर्ण मौन धारण करून बसला असतां बलवत्तर कलह पाहून स्वपक्षीयांस उद्विग्न होऊन ह्मणतो.)

**सुवर्ण**—वत्सांनो, हे अस्मत्पक्षीय धातुगणहो, शांत व्हा, काय ह्या तुच्छ पाषाणांशीं कलह करितां? अशा क्षुल्लक वादांनीं काय आमच्या उच्चनीचत्वाचा निवाडा होणार?

१ भ्रमर. २ रसाच्या गोडीकरतां. ३ ज्या पद्माला. ४ मंडूक. ५ कमळाला. ६ खेद.

उगीच कोंडा कांडावा आणि हातास फोड उत्पन्न करून घ्यावे यांत अर्थ नाहीं. याकरितां सारासार विचार जाणणारा जो भगवान् श्रीरामराजा, ज्याच्या राज्यांत अन्याय नाहीं, ज्या ठिकाणीं धर्म, न्याय, आणि दया हे गुण मूर्तिमंत वास करितात, त्या श्रीरामचंद्र राजाच्या चरणाकडेस जाऊन सर्वांनीं विज्ञापना करावी ह्मणजे तो मात्र आमच्या उच्चनीचत्वाचा निवाडा करील. काय सभासद, यावर आपलें अनुमत आहे ?

**सभ्य**—( प्रशंसा करून ) शाबास! ही मात्र युक्ति फारच पसंत आहे! आह्मी देखील त्या ठिकाणीं येण्यास कबूल आहों.

**मुक्ता**—( हर्षयुक्त होऊन ) वाहवा ! सुवर्णा, चांगली युक्ति काढलीस! हा मात्र तुझा विचार आह्मांस फारच आवडला.

(सर्व उठून जातात.)

**द्वितीय अंक समाप्त.**

---

## अंक ३.

श्लोक. ( शार्दूलविक्रीडित. )

उत्फुल्लामलकोमलोत्पलदलश्यामाय रामामनः-
कामायाप्रतिमाननिर्मलगुणग्रामाय रामात्मने ।
योगारूढमुनींद्रमानससरोहंसाय संसारवि-
ध्वंसाय स्फुरदोजसे रविकुलोत्तंसाय पुंसे नमः॥१॥

**अर्थ**–प्रफुल्लित, निर्मळ आणि मृदु अशा काळ्या कमळाच्या पत्रांप्रमाणें ज्याचा श्यामवर्ण आहे; सीतेच्या मनास रमविणारा; उपमारहित आणि निर्दोष ज्याचे गुणसमुदाय आहेत; योगसिद्ध जे ऋषिश्रेष्ठ त्यांच्या मानसरूपी सरोवराचेठायीं वास करणारा हंसच; भक्तांचें संसारभय चुकविणारा; दैदीप्यमान आहे तेज ज्याचें; आणि सूर्यकुलाचें भूषण अशा रामस्वरूपी पुरुषाला नमस्कार असो.

### प्रवेश. १

**पात्रें**—श्रीराम राजा, लक्ष्मण, प्रधान, विजयक, रुचिरक व ब्राह्मण.

(तदनंतर राजाधिराज श्रीरामचंद्र, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न आणि सुमंत प्रधान इत्यादिकांसह सभास्थानीं येतात. )

**श्रीरामराजा**–( भद्रासनावर बसून बांधवांप्रत ) बांधवहो, जी मी नित्य राजधुरा वहातों ही एकंदरींत तुमच्यावर अवलंबून आहे. कारण राज्यरूप मंडपाचा मी मुख्यस्तंभ

आणि तुह्मी आधारस्तंभ होत. आधारस्तंभांतून एकादा स्तंभ जर जीर्ण अथवा वक्र झाला तर तेवढ्यानेंच तो मंडप व्यंग होतो व तेणेंकरून त्या मंडपाश्रयानें रहाणाऱ्या लोकांस सुख होत नाहीं. जसा देहधारी जीव आपल्या करचरणादिक अवयवांतून एकाद्या अवयवानें कमी असला ह्मणजे त्याला देहसंबंधी सौख्य पूर्णत्वानें प्राप्त होत नाहीं व त्यापासून तो फारच दुःखी असतो तद्वत् अंगहीन राज्यमंडपांत रहाणाऱ्या प्रजा दुःख पावतात. दुःखित झालेल्या प्रजा राजाचें कल्याण इच्छीत नाहींत, तेणेंकरून तो राजा धर्म, न्याय, कीर्ति, धृति, लक्ष्मी, लज्जा, आणि तेज यांहींकरून रहित होऊन शेवटीं नरकाचा अधिकारी होतो. अहो, राज्य ह्मणजे तुह्मी काय समजतां? जर यथायोग्य चालेल तरच तें राज्य, नाहीं तर तो मूर्तिमान् नरकच ह्मटला तरी चालेल. अन्यायवर्ती राजास प्राप्त होणारा दुःखद परिणाम मनूनें दाखविला आहेः—

'मोहाद्राजा स्वराष्ट्रं यः कर्षयत्यनवेक्षया।
सोऽचिराद्भ्रश्यते राज्याज्जीविताच्च सबांधवः १ मनु.

ह्मणजे जो राजा शिष्टजनाचें पालन आणि दुष्ट जनांचें हनन इत्यादि राजधर्माचें अवेक्षण न करून केवल मोहानें ग्रस्त होत्साता करदंडादियोगानें प्रजांस पीडा उत्पन्न करितो तो राजा स्वल्पकालानेंच राज्यापासून व जीवितापासून पुत्रबांधवांसमवेत भ्रष्ट होतो. प्रजानिरोधानें राज्याचा आणि प्राणांचा नाश होतो. याविषयीं दृष्टांतः—

'शरीरकर्षणात्प्राणाः क्षीयंते प्राणिनां यथा ।
तथा राज्ञामपि प्राणाः क्षीयंते राष्ट्रकर्षणात् ॥ २ ॥ मनु.

ह्मणजे अन्नोदकाचा निरोध केल्यानें जसे प्राणधारकांचे प्राण क्षीण होतात त्याचप्रमाणें अन्यायतः करदंडादिकें-करून राज्यकर्षण करणाऱ्या राजाचेही प्राण विनाशाला पावतात. अतएव राजानें न्यायमार्गास अनुसरून आत्मशरीराप्रमाणें राज्याचें संरक्षण करावें:—

यथोद्धरति निर्दाता कक्षं धान्यं च रक्षति ।
तथा रक्षेन्नृपो राष्ट्रं हन्याच्च परिपंथिनः ॥ ३ ॥ मनु.

धान्यकवनकर्ता कर्षक जसा आपल्या शेतांत बरोबरच उत्पन्न होणारीं जीं तृणें व धान्यें त्यांतून धान्याचेंच रक्षण करतो आणि तृणाला दूर टाकितो, त्याचप्रमाणें राजानें आपल्या राज्यांत असणाऱ्या दुष्टांस दूर पिटाळून द्यावें अथवा ठार मारावें आणि जे शिष्ट आहेत ते जरी त्या दुष्टांबरोबरच उत्पन्न झालेले त्यांचेच भाऊबंध असले तथापि साधुत्वास्तव त्यांचें पालनच करावें. एवंच मन्वादिप्रणीत धर्मानुसरणानें प्रजारक्षण करणारा राजा उत्कर्षास पावतो आणि तद्विपरीत वर्तन करणारा नरकास जातो 'राज्ञां हि परमो धर्मः प्रजानां परिरक्षणं' राजांचा मुख्यधर्म ह्मटला ह्मणजे प्रजारक्षणच होय. या धर्मावांचून राजांचें अभीष्ट पुरवणारा दुसरा धर्म नाहीं. तस्मात् हे बांधवांनो, राज्यरक्षणाविषयीं सर्वांनीं फार जपलें पाहिजे. या राज्यमंडपाचा रक्षक मी जरी मुख्य स्तंभ असलों तथापि तुह्मी

एकंदरींत आधारस्तंभ आहां. यास्तव माझ्याप्रमाणेंच या राज्यरूप मंडपाच्या रक्षणाविषयीं तुमचेंही दृढत्व असलें पाहिजे. आतां हें तुह्मांला सांगण्याचें प्रयोजन नाहीं. कारण तुह्मी चांगले सुशिक्षित आहांत. परंतु कालाच्या दुरत्यय गतीस्तव मतिवैषम्य न व्हावें ह्मणून सादर होण्याकरितां एवढें बोललों.

**लक्ष्मण**–( भक्तियोगानें सद्गद होऊन व हात जोडून ) हे प्रभो, जगत्पालका, या दासांला वारंवार शिक्षण करून सावध करतां ही मोठीच अनुकंपा आहे. याचप्रमाणें आह्मां सेवकांला वारंवार सेवाप्रयोजन सांगून कृतार्थ करावें. वस्तुगत्या या राज्यकारभारांत ह्मटलें ह्मणजे आह्मी साहाय्य करणारे हें मी मुळींच ह्मणत नाहीं. आह्मी होईल ती सेवा मात्र करूं. आतां यथान्याय राजकीय व्यवस्था ही केवल आपल्या लीलेनें सहजच होत आहे आणि पुढेंही होणारच याविषयीं इतराचें साह्य उपयोगी काय होणार! हे राजीवनेत्रा रघुपते, महानुभाव समर्थ जे दुर्घट कार्याविषयीं पुढारी होतात त्यांच्या सिद्धीस मदत करणारें त्यांचेंच सत्व होय. त्या जागीं असमर्थाचें साहाय्य कसें उपयुक्त होईल? महाराज, असें पहा–' **एकचक्रो रथो यंता विकलो विषमा हयाः । आक्रमत्येव तेजस्वी तथाप्येको नभस्थलं** ' भगवान् तेजस्वी सविता आकाशगोलभ्रमणासाठीं ज्या वेळीं पुढारी होतो आणि एकाच दिवसांत सर्व खगोलाचें आक्रमण करून लोकतंत्रें चालवितो त्या वेळीं त्या सूर्याला आत्मतेजावांचून कोण बरें सहायी होतो? आतां साहित्य

ह्मणावें तर एक चक्राचा रथ, मोडका सारथि, विषम आणि विषदूषित घोडा. बरें मार्ग तरी नीट असावा तर क्षणभर विसावा घेण्यास देखील थारा नाहीं असा निराश्रय मार्ग; असें असतां तो एकटा एवढें अनिर्वचनीय कार्य करतो. तेजस्वी पुरुष इतरांच्या मदतीची इच्छा करीत नाहीं. व त्याचें साहाय्य करण्यासही कोणी समर्थ होत नाहीं. तथापि हे जगत्पालका सीतापते, तुझी जर या दासांवर पूर्ण कृपा झाली तर या सेवकांला राज्यरक्षणसंबंधीं कार्य जड होईल असा अर्थ नाहीं. देवा, तुझ्या तेजानें पाषाण देखील जलावर तरले गेले. पाषाणाचा धर्म ह्मटला ह्मणजे आपण बुडावें आणि आपल्या आश्रयानें असणाऱ्यांला बुडवावें, ते पाषाण तुझ्या कृपेनें आपण तरून आश्रितांलाही तारण्याविषयीं समर्थ झाले. अशी अघटितघटना करणारी जी तुझी कृपा ती आमच्याकडून यथान्याय प्रजारक्षणादिक कार्यें करविण्यास असमर्थ होईल काय?

**श्रीरामराजा**–( प्रसन्नहृदय होऊन ) वत्सा लक्ष्मणा, तूं निपुणच आहेस व माझा अत्यंत प्रियभक्त आहेस. तसेच भरतशत्रुघ्नादिकही माझ्या सेवेविषयीं तत्परतेनें वागतात. मग तुमच्यावर पूर्ण कृपा कां नसेल? मी भक्तिगम्यच आहें आणि जे मला भजतात त्यांनां मीही भजतों. ( सुमंत्र प्रधानाकडेस वळून ) अमात्यवर्या, तूं मोठा चतुर आहेस. तुला विशेष सांगितलें पाहिजे असें नाहीं, परंतु प्रजारक्षणाविषयीं मी फारच उत्कंठित आहें यास्तव माझ्यानें सांगितल्या-

वांचून रहावत नाहीं ह्मणून सांगतों. आतां जो विषय प्रजापालनाच्या उद्देशानें मी बोलून गेलों तो त्वां ऐकिलाच असेल; परंतु त्याशिवाय तुला एक विशेष सांगतों. सर्वांपेक्षां ब्राह्मणवर्णाकडेस विशेष जपून वागत जावें. ब्राह्मणांला कोप येऊं देऊं नये. त्यांची कधींच अवज्ञा करूं नये, त्यांनां कोणाचपासून उपद्रव प्राप्त होऊं देऊं नये, त्यांचे आशीर्वाद नित्य घेत असावें, व एकंदर क्षत्रियांचा वंशवृक्ष ब्राह्मणांच्या आशीर्वादसलिलानें निरंतर वर्धमान व्हावा एतदर्थ त्यांचा प्रसाद नित्य संपादन करावा. ज्या क्षत्रियांनीं ब्राह्मणांला कोपविलें त्या क्षत्रियांचा समूल वंश तो ब्राह्मणकोपाग्नि परिवारासह भस्म केल्यावांचून रहाणार नाहीं. प्रधाना, तुला विशेष काय सांगूं, मी कोणालाच भीत नाहीं. इंद्राला भीत नाहीं, यमाला भीत नाहीं. त्याचप्रमाणें अग्नि, सूर्य, कुबेर, चंद्र, वायु, इत्यादिकांलाही भीत नाहीं. किंबहुना लोकपितामह ब्रह्मदेव आणि देवाधिदेव महादेव यांचें सुद्धां मला भय वाटत नाहीं. तथापि मी ब्राह्मणांच्या अवज्ञेपासून फारच कंपित होतों, तसे हेमंतऋतूंत वस्त्रहीन दरिद्रीसुद्धां कांपत नसतील. हे सचिवोत्तमा, ब्राह्मणांनीं अन्याय केला किंवा शिव्या जरी दिल्या तथापि त्यांचा मात्र अवमान करूं नये, त्यांच्याकडेस विनयानें जपून वागावें. (लक्ष्मणादिकांकडेस पाहून ) बांधवांनो, तुह्मीही इकडेस अवधान पुरवा. जो राजा विनयानें वागतो त्याचें सर्वदा कल्याण होतें. या विषयीं मन्वाज्ञा प्रमाण आहेः—

बहवोऽविनयान्नष्टा राजानः सपरिच्छदाः ।
वनस्था अपि राज्यानि विनयात्प्रतिपेदिरे ॥४॥ मनु.

ह्मणजे ब्राह्मणांकडेस अविनयानें वागणारे बहुत राजे गजतुरगादि परिवारासह राज्यापासून भ्रष्ट झाले आणि विनयामुळें दीन वनवासी देखील राज्याचे अधिकारी झाले. आतां अविनयानें कोण भ्रष्ट झाले आणि विनयानें कोण तरले तें सांगतोंः—

वेनो विनष्टोऽविनयान्नहुषश्चैव पार्थिवः ।
सुदासो यवनश्चैव सुमुखो निमिरेव च ॥ ५ ॥
पृथुस्तु विनयाद्राज्यं प्राप्तवान् मनुरेव च ।
कुबेरश्च धनैश्वर्यं ब्राह्मण्यं चैव गाधिजः ॥६॥ मनु.

अर्थ—वेन राजा ब्राह्मणांचा अवमान करून तत्काल मरण पावला; नहुषराजा द्विजावमानापासून अजगर झाला; त्याचप्रमाणें सुदास यवनपुत्र, निमि, सुमुख इत्यादि राजे अविनयापासून नाश पावले. आतां विनयधारणानें पृथुराजा आणि मनु हे राज्याधिकारी झाले. तसाच कुबेरही विनयग्रहणानें धनाधिपति झाला. विश्वामित्र राजा असून त्याच राजदेहानें ब्राह्मणत्व मिळविता झाला. एवंच विनयापासून वहुत राजे तरले आणि अविनयानें बहुतांचा नाश झाला. विनयानें जें कार्य होऊं शकेल तें दुसऱ्या कोणत्याच उपायानें होणार नाहीं. विनयवान् पुरुष श्रेष्ठ लोकांत मान्य होतो आणि अविनीत कोणालाच आवडत नाहीं. असो, तात्पर्य ह्मणून एवढेंच ‘ विनीतात्मा हि नृपतिर्न विनश्य-

ति कर्हिचित् ' विनयसंपन्न राजा कधींच नाशाला पावत नाहीं. सचिवोत्तमा, ही विनयविद्या सहज प्राप्त होणारी असें समजलास काय ? तर ती तशी प्राप्त होणार नाहीं. कदाचित् स्वबुद्धिविलासानें अथवा शास्त्रार्थविवेचनानें जरी एकादा पुरुष विनयवान् झाला, तरी चांगल्या विद्याविनयसंपन्न ब्राह्मणाकडेस या विद्येचा पृथक् अभ्यास नित्यशः ठेविला पाहिजे, तरच ही विद्या प्राप्त होणार. ' तेभ्योऽधिगच्छेद्विनयं विनीतात्मापि नित्यशः ' सर्ववर्णांचे उपदेष्टे ब्राह्मण होत. ' वर्णानां ब्राह्मणो गुरुः ' ब्राह्मणांची सेवा केल्यावांचून क्षत्रियादि सर्ववर्णांचा कोणताच अर्थ सिद्धीच्या अवसानाला पोहोंचणार नाहीं. त्यामध्यें आह्मां क्षत्रियांला तर या राज्यव्यवहाररूप दुस्तरतरंगिणीच्या पैलतीरास पोहोंचविण्याविषयीं हे कर्णधारच होत. अतएव ब्राह्मणांची अनन्यत्वानें नित्यशः उपासना करणें हाच क्षत्रियांचा मुख्य धर्म होय. 'ब्राह्मणान्पर्युपासीत प्रातरुत्थाय पार्थिवः । त्रैविद्यवृद्धान् विदुषस्तिष्ठेत्तेषां च शासने ' अशी स्मृति आहे. राजानें प्रतिदिवसीं प्रातःकालीं ब्राह्मणाची उपासना करावी आणि त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागावें. आतां ते ब्राह्मण कोणत्या प्रकारचे असले पाहिजेत ? केवल जन्मतः ब्राह्मण नव्हेत, तर अर्थतः आणि ग्रंथतः वेदत्रय जाणणारे अंतर्बाह्य अर्थाचे निरूपणांत कुशल, आन्वीक्षिकी, आत्मविद्या, दंडनीति, धनुर्वेद, इत्यादिकांच्या ठायीं निष्णात आणि शुद्ध असे असावे. इतकेंही असून तपानें आणि वयानें वृद्ध असणें हें

फारच दुर्लभ आहे. वृद्धसेवा करणारा राजा त्रैलोक्य-पूज्य होतो '**वृद्धसेवी हि सततं रक्षोभिरपि पूज्यते**' वृद्धसेवी राजा राक्षसांनां देखील पूज्य होतो. ते दुराचारी, दुर्विनीत आणि हिंस्र असतांही याचें हित करितात, मग श्रेष्ठजन करतील यांत संदेहच नाहीं. बांधवहो, हा उक्तविषय हृदयांत स्थिर करून व्यवहार करा, ह्मणजे कोणत्याच ठिकाणीं अपयश व अमांगल्य प्राप्त होणार नाहीं.

**लक्ष्मण**–( हात जोडून ) आज्ञेप्रमाणें सेवा करण्यास हे किंकर सिद्ध आहेत.

**श्रीरामराजा**–प्रधानश्रेष्ठा, तूंही याचप्रमाणें विचार करून वागत जा. अरे, हा राज्यकारभार बहुधा प्रधानावरच अवलंबून असतो. याकरितां राजानें प्रधानास वारंवार सावधान राखिलें पाहिजे आणि जे चांगले सुशिक्षित असतील तेच या कामीं योजिले पाहिजेत. '**मौलान् शास्त्रविदः शूरॉंल्लब्धलक्षान् कुलोद्गतान् । सचिवान्सप्त चाष्टौ वा प्रकुर्वीत परीक्षितान्**' मौल ह्मणजे पितामहादि क्रमानें सेवा करणारे, दृष्टादृष्टार्थशास्त्र जाणणारे, धैर्यवान्, चांगले झुंझार, विशुद्धकुलामध्यें उत्पन्न झालेले, असे सुपरीक्षित असे सात किंवा आठ अमात्य राजानें करावे अशी स्मृति आहे. त्या स्मृत्युक्तलक्षणांनीं तूं परिपूर्ण आहेस अशी मला खात्री आहे. त्यांतही तूं माझ्या पूर्वींचा, तस्मात् तुला म्यां विशेष सांगितलें पाहिजे असें नाहीं, परंतु उगीच सावध रहाण्याकरतां सूचना केली.

**प्रधान**–( नम्र होऊन ) प्रभो अयोध्याधिपते, बुद्धीचा चालक आपल्यावांचून आणखी कोण आहे? स्वामीनें दिलेल्या मतीप्रमाणें होईल ती सेवा करण्यास हा किंकर मागें सरणार नाहीं. ( लज्जित होऊन ) महाराज, आपण काय बोललां मघाशीं ? मी आपल्या पूर्वींचा आहें काय ? देवा, आपण पुराणपुरुष जगताची उत्पत्ति करणारे. या सृष्टीच्या पूर्वी आपल्यावांचून कांहींच नव्हतें. सृष्टीच्या अवसानींही आपणच अवशेष रहाणार. विद्यमानकालीं तंतुपटन्यायें आंत बाहेर विश्वांत व्यापून असणारे आपणच आहांत. असें असतां मी तुमच्या पूर्वींचा कसा बरें होईन? मला वाटतें कीं ही दासाची प्रतारणाच मांडली असावी.

**श्रीरामराजा**–(हास्य करून) नाहीं रे, ही प्रतारणा नव्हे. तूं माझ्या वडिलांच्या कारकीर्दींत वागलेला या अभिप्रायानें बोललों, उगीच भलभलते अर्थ करून खिन्न होऊं नको. तुझ्यावर माझी पूर्ण कृपा आहे. तूंही माझ्या ठायीं अव्यभिचारी भक्तियोगानें वागत जा ह्मणजे कृतार्थ होशील.

**प्रधान**–आज्ञा महाराज. (इतक्यांत विजयक येऊन प्रणिपात करतो. )

**विजयक**–महाराजांचा जय असो.

**श्रीराम.**–सेवका, कल्याण. अरे विजयका, प्राणप्रियेच्या मंदिरांत जाऊन आलास काय?

**विजयक**–सरकार, हा नुकताच जाऊन आलों.

**श्रीरामरा.**–( प्रेमभरानें) मग प्रिया काय करीत होती ?

**विजयक**—आपल्या चिंतनावांचून दुसरें कोणतें कार्य आहे? कालच्या दिवसांत तिकडे स्वारी गेली नाहीं! तेणें-करून बाईसाहेब फारच खिन्न आहेत.

**श्रीराम राजा**—(सभय होऊन) अहाहा! माझ्यासाठीं प्रिया जानकी खिन्न आहे काय? विजयका, काय तुला सांगूं, कालच्या दिवसांत पौरकार्यांची घनदाटी झाल्यामुळें जानकीच्या मंदिरांत जाण्यास अवकाश मिळाला नाहीं. आतां प्रिया फारच रुष्ट होणार, मी आतां एकामुहूर्तानंतर प्रियेस भेटण्याकरितां जाईन तोंपर्यंत प्रियेनें खेदानें कोमलतनूचें शोषण मात्र न केल्यास ठीक आहे.

( इतक्यांत रुचिरक येऊन प्रणिपात करितो. )

**रुचिरक**—विजयोऽस्तु राज्ञः!

**श्रीराम**—सेवका, कल्याण. अरे, रुचिरका, फार वेळ कोठें होतास?

**रुचिरक**—स्वामिन्, मला मातोश्रीच्या समाचारासाठीं पाठविला होता ना? हा मी आतांच समाचार घेऊन आलों.

**श्रीराम**—हां, बरोबर मातोश्रीला भेटून आलास काय? मातेची काय आज्ञा आहे.

**रुचिरक**—आज्ञा एवढीच कीं स्वारी मातोश्रीच्या मंदिरांत गेली पाहिजे. आपल्यावांचून कौसल्यामाता भोजनास बसतील असें वाटत नाहीं.

**श्रीराम**—ठीक. संधि तर बराच जमून आला. आतां पूर्वी मातोश्रीला भेटून पश्चात् प्राणप्रियेच्या मंदिरांत प्रवेश करूं.

( विजयकाप्रत ) अरे, विजयका, हा याचकप्रतीक्षेचा समय आहे. मी मुहूर्तमात्र या ठिकाणीं वाट पहात बसतों तों पर्यंत कोणी अतिथी अभ्यागत अथवा कोणत्याही हेतूनें याचकादिक जर द्वारीं येतील तर त्यांस उभें रहाण्याचे श्रम न देतां त्याच वेळीं मला येऊन वर्दी दे ह्मणजे त्यांची यात्रा सफल करून मातोश्रीच्या दर्शनास जाईन.

**विजयक**–आज्ञा महाराज. ( बाहेर जाऊन रहातो इतक्यांत एक दरिद्री ब्राह्मण धोकटी खांद्यावर घेऊन राजद्वारीं येतो. )

**ब्राह्मण**–सेवका, कोणी याचक द्वारीं आला आहे असें राजाला जाऊन सांग. जा जा लौकर, विलंब करूं नको.

**विजयक**–( विनोदानें) जा जा, लौकर, केवढी तरी भटाची गडबड ! अहो, इतके हुळहुळतां कशाला ? हां ! मी समजलों, ही सारी दक्षिणेची घाई, ती हातावर पडेपर्यंत भटाला चैन पडणार नाहीं. भटजीबुवा, तुमची दक्षिणा दुसऱ्याला मिळेल काय ?

**ब्राह्मण**–जारे बाबा लौकर, नको रे विनोद करूं. अरे, मला एका गृहस्थाच्या घरीं बरोबर मध्यान्हकाळीं गेलें पाहिजे

**विजयक**–हां ! तीच गडबड ही. 'ब्राह्मणो भोजनप्रियः' जरासा वेळ जर गुजरेल तर मिष्टान्न चुकेल आणि त्यापुढं दक्षिणा–

**ब्राह्मण**–अरे, तूं जाणार कीं नाहीं तें एकदांचें सांग मला जाऊंदे.

**विजयक**–भटजीबुवा, त्या गृहस्थाच्या घरीं पुऱ्या, मांडे, जिलब्या, लाडू, घिवर इत्यादि पदार्थांची गर्दीच असेल. आज तुमचा सुकाळच आहे! हवा तसा हात मारा! महाराज, एक मात्र करा, हात जोडून सागतों, पुढचा प्रकार जपून होऊं द्या. उगीच गृहस्थाच्या प्रयोजनांत मात्र विघ्न उत्पन्न होईल आणि तुमचीही दक्षिणा बुडेल.

**ब्राह्मण**–(रोषानें) गाढवा, तुझी जिव्हा फार लांब झाली गरीबसा ब्राह्मण पाहून थट्टा करतोस काय? राजाधिराज श्रीरामचंद्राला असला तूं घाणेरडा चाकर योग्य नाहींस.

**विजयक**–महाराज, रोष करूं नका. हा मी निघालों, परंतु जें तुह्मांला महाराजांकडून मिळेल त्यांतील अर्धें मला द्याल ना?

**ब्राह्मण**–(दचकल्यासारखा होऊन) हें रे बाबा काय? केवढा रे तरी उशीर झाला हा? बारा घटिका होऊन गेल्या, वेळ जर चुकेल तर त्या यजमानाचा शब्द लागेल.

**विजयक**–वः! शाबास! लागलीच भटानें दुसरी गोष्ट काढली. देण्याचें ह्मटलें ह्मणजे बुडालें. त्या वेळीं हजारों गोष्टी येऊन पुढें ठेपतात. बरें असो. भटजीबुवा, तुह्मी मला कांहीं देऊं नका, बसा मात्र तुह्मी. क्षणभर प्रपंचाच्या गोष्टी करूं.

**ब्राह्मण**–(फारच चिडून) जळो रे तो या वेळीं प्रपंच! तूं करतोस थट्टा! मोठ्या डामडौलाचा जर कोणी आला असता तर झकत जाऊन वर्दी दिली असतीस.

**विजयक**–( मोठ्या गर्वानें ) मी सरकारच्या तेजावर इंद्राला देखील जुमानीत नाहीं. मग इतरांची काय कथा ?

**ब्राह्मण**–(आपल्याशीं, हां! बरीच संधी सांपडली आतां. या उन्मत्ताची खावड बरीच काढतों ( उघड ) मूर्खा विजयका, ऐकून घे. तूं आपली किती जरी बढाई सांगितलीस तरी सेवक किती झाला तरी चाकर. '**को नीचः सेवकादन्यः**' वेतन घेऊन जो सेवा करतो त्याच्याहून दुसरा नीच आहे काय ? हे मदोन्मत्ता, नीतिशास्त्र जाणणाऱ्या ऋषींनीं एका पंक्तीनें पांच निवडून काढिले आहेत '**जीवंतोऽपि मृताः पंच ऋषिभिः परिकीर्तिताः। दरिद्रो व्याधितो मूर्खः प्रवासी नित्यसेवकः**' एक दरिद्री, दुसरा व्याधिग्रस्त, तिसरा मूर्ख, चवथा प्रवासी, आणि पांचवा नित्यसेवक. इतके असामी जीवंत असून मृताप्रमाणें मानिले आहेत. ह्मणजे त्यांचें वांचणें व्यर्थ होय. अशा विफलजीवितांच्या पंक्तींतला तूं सेवक असून मोठे डौल सांगतोस. तुला लज्जाच नाहीं काय ?

**विजयक**–भटजीबुवा, मी त्यांतला सेवक नव्हे. मी श्रीरामचंद्राचा दास आहें. आमचे प्रभु इतरांप्रमाणें आपल्या किंकरांला तुच्छ मानीत नाहींत. त्या दयाघनाचें दाक्षिण्य किती तुह्मांला सांगूं ? आमचे महाराज अखिलसद्गुणांचें अवधिस्थानच होत. अहो, प्रभूंच्या सेवकांच्या हृदयांत आपण सेवक असें भानच रहात नाहीं. कारण ते सेवकांकडे मित्रांप्रमाणें वागतात. मित्रांकडे बांधवांप्रमाणें चालतात,

आणि बांधवांवर आत्मप्राणाहून विशेष प्रीति करितात. तेणें-करून बांधवांच्या मनास आपणच मूर्धाभिषिक्त राजे असा भास होतो. याप्रमाणें आमचे प्रभु गौरव करीत असतां आह्मी इतर सेवकांप्रमाणें विफलजीवी ह्मणण्यास कसे योग्य होऊं?

**ब्राह्मण**—अरे, स्वामीनें किती जरी मान दिला तथापि तो पराश्रय आहे. पहा, महादेवानें मोठ्या गौरवानें चंद्राला माथ्यावर घेतला, परंतु तो पूर्वी होता तसाच कृश राहिला. त्यास पूर्णत्व कधींच येत नाहीं. करितां पराश्रिताला मानही जरी असला तरी पारतंत्र्यानें रहावें लागतें. यास्तव तत्संबंधी सौख्य मिळणें फारच कठिण आहे. विजयका, तूं विचार करीत नाहींस यावरून तुला या विषयाचें मोठें महत्त्व असें वाटतें, परंतु सेवकवृत्तीपेक्षां श्वानवृत्ति देखील चांगली ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं याविषयीं एका नीतिज्ञाचें प्रमाण आहे '**सेवा श्ववृत्तिर्यैरुक्ता न तैः सम्यगुदाहृतम्। स्वच्छंदचारी कुत्र श्वा विक्रीतासुः क सेवकः**' सेवकाची वृत्ति श्वानवृत्तिसारखी निंद्य आहे. असें कित्येक पंडित ह्मणतात, परंतु हा वाक्यकार ह्मणतो कीं तें त्याचें ह्मणणें बरोबर नव्हे. कां तर तो श्वान जरी परान्नसेवी असला, तरी स्वच्छंदसंचारी आहे, आणि सेवक हा आपले प्राण देखील स्वामीला विकून त्याचा झाला. याचें स्वत्व देहावर सुद्धां राहिलें नाहीं. हा जर आपलें अंग खाजवणार तर स्वामीची आज्ञा पाहिजे. मग स्वच्छंदचारी कुत्रा कोणीकडे आणि

प्राणविक्रय करणारा बिचारा चाकुरडा कोणीकडे? विजयका याप्रमाणें सेवकाची स्थिति आहे. असें असतां तूं जो गर्वानें फुगतोस त्या तुला आतां सांगावें तरी काय?

**विजयक**–( ओशाळल्या सारखा होऊन ) भटजीबुवा, तुह्मी काहींच न कळते असें वाटत होतें. परंतु श्लोकवाक्यें ह्मणून आमच्यावर बराच प्रकाश पाडलात. आह्मांला तुमच्यासारखें सुभाषित काय येत नाहीं. आह्मीं केवल रामदास्यासारखें जीवितसाफल्य दुसरें नाहीं असें समजत होतों, परंतु तुह्मी जर आह्मांला या कर्मानें विफलजीवी ह्मणतां तर आतांच यांतून मुक्त होतों.

**ब्राह्मण**–( भयानें कंपित होऊन ) विजयका, हें रे काय बाबा? माझ्या बोलण्यापासून प्रभूची सेवा सोडतोस काय वेड्या? तूं मला भलतेंच बोललास ह्मणून मीही थट्टाच केली. परंतु तुला तें खरेंच वाटलें. हे रामभजका, बहुत जन्में तपश्चर्या करून पुण्याचे संचय जोडणारे जे तपस्वी त्यांनां या रामचंद्राचें पादरज सुद्धां मिळणें कठिण; तें हें साक्षात् पूर्ण ब्रह्म तुह्मांला सदैव मिळतें आणि सेवाही घडते; मग तुमच्यासारखे भाग्यवान् कोण आहेत बरें? विजयका, रामदासांवर काळाची तरी सत्ता आहे काय? हा रामसेवेचा लाभ इंद्रादिकांलाही दुःसाध्य आहे. परंतु बहुजन्मकृत पुण्योदयानें तुला सांपडला तो मात्र थट्टेनें व्यर्थ गमावशील हो!

**विजयक**–( मोठ्या हर्षानें ) भटजीबुवा, तुमच्या थट्टेनें मी रामसेवा सोडीन असें समजलां? छेः! प्राण गेला

तरी पतकरलें, परंतु रामप्रभूला सोडून क्षणमात्र रहाणार नाहीं. केवल तुमच्या मनांतील अर्थ ओकविण्याकरितां असें बोललों. अहो, मी काय वेडा आहें ?

**ब्राह्मण**—नाहीं रे, तूं मोठाच शहाणा आहेस, परंतु एवढा वेळ पर्यंत मला राजभेटीला नेत नाहींस एवढाच मात्र कायतो तुझा वेडेपणा.

**विजयक**—( हात जोडून ) महाराज, अपराधी आहें क्षमा असावी. मी आपणास फार विलंब लाविला. मला महाराजांची आज्ञा अशी होती कीं महाद्वारावर जर कोणी आला तर त्यास क्षणमात्र देखील उभा रहाण्याचे श्रम देऊं नयेत. असें असतां म्यां मूढानें आपणास फार श्रम दिला. ब्राह्मणोत्तमा, काय सांगूं, माझा स्वभाव मोठा विलक्षण आहे, मला थट्टा विनोद फार आवडतात. त्यावांचून माझ्यानें रहावत नाहीं. त्यांत तुमच्यासारखे विनोदी सांपडले ह्मणजे माझ्यानें त्यांनां सोडवत नाहीं. बरें, असो. आतां मी महाराजांकडेस जातों. (राजाकडेस जाऊन प्रणिपात करतो ) महाराजांचा जय असो !

**श्रीराम**—कोणरे ? विजयका, कां आलास ?

**विजयक**—महाराज. कोणी याचक ब्राह्मण द्वारावर येऊन आज्ञेची वाट पहातो.

**श्रीराम**—( हर्षानें ) फार उत्तम, जा त्याला लवकर घेऊन ये.

**विजयक**—भटजी बुवा, महाराज वाट पहातात, चला लवकर.

**ब्राह्मण**—( मोठ्या घाईनें ) हा मी तयार आहें ( असें ह्मणून आपल्या सामग्रीसह डौलानें राजदर्शनास जातो.)

**विजयक**—( विनोदानें ) भटजी बुवा, या वेळीं तुमचा चेहरा फारच शोभतो. वाहवारे वाहवा! पाठीवरती धोकटी, तिच्यावर ती कांबळी, डोक्यास तो पंचा, काखेस ती विभूतीची बटवी, अंगास ते भस्माचे पट्टे, ती वाढलेली हजामत, केवढी तरी सुशोभित मुद्रा! गडबडीनें चालत असतां कास आणखी सुटेल! तरी अजून धोकटींत पैसे पडलेच नाहींत. पुढें आणखी पुष्कळ पहावयाचें आहे.

**ब्राह्मण**—अरे लबाडा, अजून तुझी थट्टा आहेच का? याच थट्टेनें एवढा उशीर लावलास, आतां महाराजांला सांगून गुलामा तुझी डोचकीच फोडायाला लावतों. तुला थट्टा पाहिजे नव्हे?

**विजयक**—( सभय होऊन ) भटजी बुवा, हात जोडतों तुह्मीच दोन काढून माझ्या थोबाडींत मारा, परंतु महाराजांपुढें माझी नाचक्की करूं नका. ‘ ही थट्टा प्रभूला ’ समजेल तर डोचकीच मारतील.

**ब्राह्मण**—( मोठ्यानें हंसून ) भ्याला, लेकीचा भ्याला, अरे भिऊं नको. मी काय तुझें वाईट सांगणार नाहीं. माझ्या बरोबर मात्र ये.

**विजयक**—हुकुम महाराज. (दोघे राजा समोर जातात)

**श्रीराम**–( आसनावरून उठून ) ब्राह्मणोत्तमा, या आसनावर बसावें आणि प्रणिपात करतों हा ग्रहण करावा.

**ब्राह्मण**–( आसनावर बसून आशीर्वाद करतोः—

श्लोक ( वसंततिलका· )

श्रीमद्रघूत्तम भवत्कुलवल्लिमेतां
नित्यं वसिष्ठपुलहक्रतुनारदाद्याः ।
आशीर्जलैरतिशयेन विवर्धयंतु
राज्यं त्वमाविधुरवि प्रतिपालयस्व ॥ १ ॥

**ब्राह्मण**–रविकुलपंकजप्रमोदभास्कर रघुपते, कुशली आहेस ना?

**श्रीराम**–तुमच्या कृपेनें कुशली आहें. परंतु, हे द्विजोत्तमा, वस्तुगत्या आमचें कुशल म्हटलें म्हणजे ब्राह्मणाधीन आहे. राष्ट्रांत ब्राह्मण निरुपद्रव असून, यम, नियम, जप, तप, स्वाध्याय, देवतापूजा, पंचमहायज्ञ इत्यादि कर्मतंत्रें आणि त्यांच्या जीविका अंतरायरहित चालाव्या व तेणेंकरून भूमिदेव निश्चित होत्साते नित्यशः सानंद असावे म्हणजे तेंच राजाचें कुशल होय. त्याचप्रमाणें एकंदर राज्यांगें प्रभावशक्ति, उत्साहशक्ति, मंत्रशक्ति, आणि प्रकृति इत्यादिकाचें कल्याण ब्राह्मणवर्णास कोणतेंच अशुभ नसणें हेंच आहे. हे द्विजश्रेष्ठा, तें आमचें कुशल तुझ्याकडूनच समजलें पाहिजे.

**ब्राह्मण**–(प्रेमभरानें) हे प्रजानाथ, सीतापते, तूं साक्षात् धर्ममूर्ति पालक असतां ब्राह्मणादिवर्णाचें कुशल म्हणून

विचारावयाचें आहे काय ? राज्यांत अशुभाची वार्ताच राहिली नाहीं. महाराज, सूर्य जर उदयाला आला तर लोकांच्या दृष्टीस आवरण करण्याविषयीं अंधकाररात्रि कशी समर्थ होईल? हे जगदुद्धारका, आपण केवल पृथ्वींत रहाणाऱ्या प्रजांचेंच अमंगल हरण केलें असें नाहीं, तर त्रैलोक्यांत रहाणाऱ्या प्रजा देखील उपद्रवरहित केल्या. अहो, रावणकुंभकर्णादि दैत्य ह्मणजे किती पराक्रमी होते? ज्या राक्षसांनीं इंद्र, अग्नि, कुबेर, यम इत्यादि सर्व देवांला जिंकून आपले किंकर करून टाकिलें, ज्यांचें नांव ऐकण्याबरोबर मोठमोठ्या रणपंडितांला सघर्म कंप सुटत होता, ज्यांच्याबरोबर रण करण्यास काळाच्या देखील मनांत कधींच वासना उत्पन्न झाली नाहीं, ते त्रैलोक्यविजयी रावणादि निशाचर आपल्या बाणतीर्थांत देह विसर्जन करून मुक्त झाले. ( सभासदांप्रत ) सभासदांनो, त्या विजयकालप्रसंगीं इंद्रादि देव, गंधर्व, विद्याधर, सिद्ध, चारण, यक्ष, किन्नर, आणि किंपुरुषादिक उपदेव हे रावणादि दुष्ट रात्रिंचरांच्या वधापासून बंधनमुक्त होत्साते आनंदसंदोहांत निमग्न होऊन या आनंदकंदाची प्रेमभरानें कीर्ति गाते झाले. या प्रकारें प्रभूनें त्रैलोक्यकंटक अशा रावणादि रात्रिंचरांचा घात करून त्रिलोकीचा उपद्रव दूर केला. अहो, प्रभूच्या कीर्तीस कोणत्या तरी थोर पदार्थाचा दृष्टांत द्यावा. सर्वांहून आकाश थोर परंतु तें सुद्धां प्रभूची कीर्ति हीच कामिनी तिच्या भालदेशास अलंकृत करण्याकरतां कस्तूरीतिलकासारखें होईल.

हे सभासदहो, पतिशापानें शिलारूप झालेली अहल्या या कल्मषनाशकाच्या पादरजानें पूर्वरूपाला प्राप्त झाली. या कीर्तीनें तर ब्रह्मांड व्यापून गेलें. त्याच प्रमाणें या प्रभूच्या नामानें पाषाण सुद्धां जलांत तरून लोकांलाही तारिते झाले. तृण ह्मणजे किती तुच्छ पदार्थ! परंतु तें देखील या प्रभूच्या संगानें अस्त्ररूप होऊन ऐंद्रकाकास भिवविते झालें. या प्रभूच्या नामप्रभावानें देवाधिदेव महादेव कालकूटविषाच्या दाहापासून मुक्त झाला. एवंच या राजाधिराज रामचंद्राच्या नित्यसमान ह्मणजे ज्यास उदयास्त व वृद्धिक्षय नाहीं अशा गुणकीर्तिचंद्रानें संपूर्ण विश्व पयःफेनासारखें शुभ्र करून टाकिलें. कालिमा ह्मणून कोणत्याच जागीं राहिला नाहीं. असें झाल्यानें सर्वांस सुख झालें, परंतु माझा एकट्याचा मात्र मोठाच तोटा झाला. अहो, अभागीच मी, मला अभाग्याला सुखदायक पदार्थांपासून सुद्धां दुःख होत असतें. '**अमृतं राहवे मृत्युः**' अमृत हा पदार्थ सर्वांस जीवन देणारा, परंतु त्यापासून राहूचा शिरच्छेद झाला.

**श्रीराम**–( सभय होऊन ) द्विजोत्तमा, माझ्या पासून तुझा तोटा झाला काय? असें होण्यास काय बरें कारण झालें?

**ब्राह्मण**–( हंसून ) राजा, तोट्याचें कारण विचारतोस काय? सांगतों तर केवढा तोटा झाला तोः—

श्लोक ( अनुष्टप् )

**राजंस्ते कीर्तिचंद्रेण तिथयः पूर्णिमाः कृताः ।**
**मद्गेहगा बहिर्याति तिथिर्नैकादशी भयात् ॥ २ ॥**

हे राजा, तुझ्या नित्यपूर्ण अशा गुणकीर्तिचंद्राच्या उदयानें प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत समग्र तिथि पूर्णिमा झाल्या, परंतु त्यांतून एक फक्त एकादशी मात्र आपणासही पूर्णिमेचें रूप प्राप्त होईल या भयानें माझ्या घरांत शिरली ती अजून बाहेर निघून जात नाहीं. हे प्रजानाथ, नित्यपूर्ण आणि उदयशील अशा तुझ्या कीर्तिचंद्राच्या योगानें पूर्वरूपापासून भ्रष्ट होऊन बाकीच्या तिथींची जी दशा झाली तीच आपल्याही वांट्यास येईल असें तिला भय असतां ती कशी बरें बाहेर निघेल आणि तिला तरी अशा तऱ्हेची जागा आणखी कोणीकडे मिळणार आहे? हाय हाय! माझ्या दुर्दैवा! हा सर्व दरोडा तुझा आहे. महाराज, पंध्रवड्यांतून एक दिवस एकादशी सोसवेनाशी होते. मग नित्य कशी हो सोसतां येईल? केवढा बरें अनर्थ हा! राजा, या अनर्थास मुख्य कारण कोण आहे हें विचारून पहा ह्मणजे झालें.

**श्रीराम**–( हास्य करून प्रधानाप्रत ) प्रधानश्रेष्ठा, भटजीबुवा मोठे गमती आहेत नव्हे?

**प्रधान**–होय, महाराज यांच्या वक्तृत्वानें आनंद झाला आणि कालही बराच गेला.

**श्रीराम**–प्रधानोत्तम, यांच्या बोलण्याचा अर्थ तुह्मांला समजला काय?

**प्रधान**–होय, महाराज.

**श्रीराम**–कोणता बोला पाहूं.

**प्रधान**— यांची सूचना एवढीच आहे कीं आपण दरिद्री आहों आणि यावरून आपणास कुटुंबासह नित्य उपवास सोसावे लागतात.

**श्रीराम**—शाबास! सचिवोत्तमा! या ब्राह्मणास एक लक्ष रुपये दे! जाऊंदे याला संतुष्ट होऊन!

**प्रधान**—आज्ञा महाराज! (ब्राह्मणापुढें एक लक्ष रुपये ओततो.)

**श्रीराम**—ब्राह्मणश्रेष्ठा, एवढ्यानें आपलें कार्य होईल ना?

**ब्राह्मण**—(चकित होऊन) महाराज, एवढें द्रव्य मला कशाला पाहिजे? हें माझ्या पडशींत रहाणार नाहीं व ठेवण्यास अवकाश तरी कोठें आहे?

**श्रीराम**—विप्रोत्तम, भिऊं नका याचा बंदोबस्त सारा मीच राखतों. (विजयकाप्रत) अरे विजयका, या ब्राह्मणाबरोबर जा आणि हें द्रव्य योग्य रीतीनें ब्राह्मणाच्या घरीं पोहोंचीव व याची व्यवस्थाही ठेव ह्मणजे झालें.

**विजयक**—आज्ञा महाराज. (द्रव्य घेऊन जातो)

**ब्राह्मण**—(संतुष्ट होऊन) राजा, तुझें कल्याण असो! आज मी विच्छिन्नदरिद्र झालों. आतां तुझ्या प्रसादानें कुटुंबासह सुखाचा अनुभव घेईन. (असें ह्मणून मोठ्या घाईनें विजयकामागून जातो)

**ब्राह्मण**—अरे विजयका थैली आहेना तुझ्याबरोबर? कोठें तरी गमावशील हो.

**विजयक**—अहो, भिऊं नका. थैली पोहोंचली तुमच्या मंदिरांत.

**ब्राह्मण**—( सभय होऊन ) तूं नाहीं का गेलास बरोबर? तर मग गठलीची काय वाट होणार कोण जाणे.

**विजयक**—(हंसून) काय नेणारे छपवितील कीं दरोडा पडेल? अहो, इतके भितां कशासाठीं? हें रामचंद्राचें राज्य आहे. या राज्यांत रस्त्यावर पडलेल्यास देखील कोणी शिवणार नाहीं हें तुह्मांला अजून ठाऊक नाहीं काय?

**ब्राह्मण**— विजयका, सांगतोस तें सारें खरें, परंतु आमचा भटांचा स्वभाव ह्मटला ह्मणजे उतावीळ, त्यांत बहुकालानें उंबराचें फूल परड्यांत उगवलें आहे, मग विचारतोस काय? चांगल्या वस्तूस विघ्नाचें भय फार.

**विजयक**—काय ह्मणतां? रामकृपा असतां विघ्न होणार! तो संदेहच सोडा ( जवळ जाऊन ) भटजीबुवा, आलों कीं तुमच्या मंदिरांत; ही घ्या थैली; मोजणार तर मोजा हो आपली, हा मी चाललों ( असें सांगून राजाच्या समोर जातो इतक्यांत दोघे ब्राह्मण महाद्वारीं येतात. )

**विजयक**—महाराजांचा जय असो!

**श्रीराम**—सेवका कल्याण!

**विजयक**—आज्ञेप्रमाणें ब्राह्मणाला पोहोंचवून आलों, परंतु आणखी दोघे ब्राह्मण महाद्वारीं आज्ञेची प्रतीक्षा करतात त्यांत एक मोठा तपस्वी श्रोत्रिय असावा असें वाटतें.

**श्रीराम**—( हर्षानें ) आज सुदिन आहे खरा. सेवव जा, त्यांनां आंत घेऊन ये.

**विज०**—आज्ञा महाराज (दोघांसही राजासमोर आणतो

**श्रीराम**—(अभ्युत्थान देऊन) द्विजोत्तमांनो, सेवक न रणीं लीन होतो.

**दोघे ब्रा०**—( आसनावर बसून ) राजा, तुजप्रत व ल्याण असो !

**श्रीराम**—विप्रोत्तमांनो, कोणत्या हेतूनें आगमन झालें

**पहिला श्रोत्रिय**—हे दीनबंधो रामचंद्रा, तुझ्या तेजा माझें अग्निहोत्र अंतरायरहित चालत आहे. सांप्रत कांह ज्योतिष्टोमादिक यज्ञ करावे अशा वासनेचा अंकुर मनोभूमी वर उगवला आहे, परंतु करावें काय? 'द्रव्येण सर्वं' त्य एकावांचून सर्व खोटें, या करितां मी फार झुरत आहें.

**श्रीराम**—एवढेंच ना? चिंता नाहीं, हें कोशगृह तुमचेंच आहे. ( प्रधानाप्रत ) सचिवोत्तमा, या द्विजोत्तमाला आरं भापासून समाप्तीपर्यंत जेवढें द्रव्य यज्ञासाठीं पाहिजे असेल तेवढें यथेच्छ पुरवावें. त्याच्या यज्ञकर्मात कार्पण्य होऊं देऊं नये.

**प्रधान**—( नम्र होऊन ) महाराज, मी कां कार्पण्य क-रीन? प्रभूच्या तेजानें जामदारखान्यांत काय तोटा आहे? द्विजोत्तमा, पाहिजे तेवढें द्रव्य न्यावें, आतांच कोशाधी-शास आज्ञा करतों.

**दुसरा ब्राह्मण**—हे रघुकुलतिलका दाशरथे, माझा पुत्र उपनयनास योग्य झाला आहे, परंतु द्रव्यबल नाहीं. जर

आपण दया कराल तर आपल्या प्रसादानें मुलास द्विजत्व-प्राप्ति होईल.

**श्रीराम**—ठीक आहे, परंतु पुढें मुलाचा विवाह करण्याचा बेत आहेना ?

**ब्राह्मण**—महाराज, विचार आह्मी सर्व करूं परंतु दीनाचे विचार कसे शेवटाला पोहोंचतील ?

**श्रीराम**—द्विजोत्तमा, मी आहें तोंपयत दीन अशा अक्षरांचा उच्चार करण्याचें कारणच नाहीं. ज्या वेळीं मी दीन होईन त्या वेळीं प्रजाही दीन होतील. ( प्रधानाप्रत ) अमात्यवर्या, या ब्राह्मणास मुलाच्या उपनयनासाठीं लागेल तें द्रव्य द्यावें आणि पुढें विवाहसमय येतांच एकाद्या ब्राह्मणाची मुलगी कुलशीलरूपगुणांनीं युक्त अशी पाहून तिच्याशीं या ब्राह्मणाच्या मुलाचा विवाह करून सोडावा. त्याबद्दल कितीहि द्रव्य लागो, अगदीं संकोच करूं नये.

**प्रधान**—आज्ञेप्रमाणें व्यवस्था करण्यास दास तत्पर आहे. ( दोघांही ब्राह्मणांस यथेच्छ द्रव्य देतो )

**दोघे ब्रा०**—( संतुष्ट होऊन ) राजा, आतां येतों बरें. आज तुझ्या प्रसादानें आमचीं इच्छित कार्यें सिद्धीच्या अवसानभूमीस पोहोंचतील. हे प्रजापालका, हा तुझा प्रजापालनरूप धर्म तुजप्रत कल्याण करो.

**श्रीराम**—द्विजोत्तमांनो, येतां काय ? कृपा असावी (दोघेही द्रव्य घेऊन जातात.)

**विजयक**—महाराज, मातोश्री वाट पहात बसल्या असतील. पुढें आणखी अवरोधगृहांत गेलें पाहिजे, मग विलंब कां?

**श्रीराम**—हा मी सिद्ध आहें. तूं जा आणि सत्वर सारथ्याला पाचारण कर.

**विजयक**—महाराज, रथ तयार आहे आपण बसावें ह्मणजे झालें.

**श्रीराम**—ठीक आहे ( राजा रथावर बसून मातोश्रीच्या मंदिरांत सेवकासह जातो )

( सर्व उठून जातात )

---

## प्रवेश २

**स्थल**—अयोध्या, कौसल्येचें मंदिर.

**पात्रें**—कौसल्या, कलावती, रामराजा, विजयक.

**कौसल्या**—(आसनावर बसून) कोण आहे ग तिकडेस? दासी लीलावती कोणीकडे गेली?

**लीलावती**—ही मी देवघरांत आहें.

**कौसल्या**—अग, तुला किती ह्मणून हाका माराव्या? तुझ्या पुढें आतां इलाज राहिला नाहीं. ओरडण्यानें घसा जरी बसला तरी तूं ओ देत नाहींस. देवघरांत असून तुला ऐकूं आलें नाहीं का? हा वेडे!

**लीलावती**—मातोश्री,रागें भरूं नका. मी देवघरांत नव्हत्यें, पुष्पें आणण्याकरितां बागेंत गेलें होत्यें, ती आतांच आलें.

**कौसल्या**—हां, लागलेंच दुसरें काढलें. बरें असो, आतां पुष्पांचें काय प्रयोजन होतें?

**लीलावती**—मातोश्री, पुढें प्रदोष कालींच्या पूजनास तरी आणलीं पाहिजे होतींना?

**कौसल्या**—बरें, आणलींस तर आणलींस. आतां दिवस किती आला तें पाहून ये जा. (बाहेर जाऊन येते)

**लीलावती**—दोन प्रहरांचा मान होऊन गेला.

**कौसल्या**—(चकित होऊन) काय ह्मणतेस दोन प्रहर झाले?

**लीलावती**—विचारतां काय? वर कांही तरी ह्मणा, या वेळेस सूर्यासमोर पहावेना देखील.

**कौसल्या**—केवढा ग बाई तरी उशीर झाला हा! माझा राम अजून कसा बरें आला नाहीं?

**लीलावती**—मातोश्री, उगीच चिंता करीत बसूं नका. महाराज येण्याची वेळ झाली आहे. किंचित् वेळ गुजरला ह्मणून चिंतेचें कारण नाहीं. तुह्मी चिंता करीत बसलां ह्मणजे आह्मांला कांहीं सुचेनासें होतें.

**कौसल्या**—तुझें ह्मणणें खरेंच आहे. प्रसूतिकेच्या वेदना वंध्येला कशा समजतील? तसाच पुत्रवतीस पुत्रवियोगानें होणारा खेद अपुत्रवतीच्या अनुभवास कसा येईल? लीलावती, तूं जर पुत्रवती असतीस तर हा अनुभव तुला आला असता.

**लीलावती**—मी तशासाठीं ह्मटलें नाहीं. आपला खेद

दूर होण्यासाठीं बोलल्यें (आकाशा कडेस पाहून) मातोश्री, खेद करूं नका खचित महाराजांची स्वारी येत आहे. हा पहा मेरूच्या उच्च शिखराप्रमाणें केतू दिसत आहे. त्याचप्रमाणें वेत्रपाणीचाहि शब्द रथचक्रशब्दांत मिसळलेला ऐकूं येतो. यावरून स्वारी येत आहे यांत संदेह नाहीं.

**कौसल्या**–( हर्षानें उत्कंठित होऊन ) माझ्या हृदयकुमुदिनीचा मृगांक रामचंद्र आला काय? (जवळ आलासें पाहून) दासीग, जा निंबलोण घेऊन ये, आणि ओंवाळून टाक.

**लीलावती**–(मोठ्या घाईनें) हें आणलें निंबलोण (ओंवाळून टाकते ) इडापीडा टळो अमंगळ जळो व महाराजांस नित्य मंगलप्राप्ति होवो.

( इतक्यांत श्रीरामचंद्र मातोश्रीच्या चरणावर मस्तक ठेवितात )

**श्रीराम**–मातोश्री, हा पुत्र चरणीं लीन होतो.

**कौसल्या**–( प्रेमभरानें पोटाशीं धरून ) रविकुलकमलप्रमोदभास्करा, मद्धृदयकमलिनीच्या राजहंसा पुत्रराया, शुक्लचंद्रन्यायें तुझ्या आयुर्लतेची वृद्धि असो! आणि नित्य तुझा द्वेष करणारे अथवा तुला क्लेश देणारे जे बाळा तुझे दुष्ट शत्रु असतील ते तुझ्या प्रतापवैश्वानरानें पतंगासारखे भस्मसात् होऊन विजयश्री तुझ्या कंठांत विजयमाळेचा प्रक्षेप निरंतर करो!

**श्रीराम**–( सद्गद होऊन ) मातोश्री, तुझ्या पायांकडेस या सेवकाची चूक मोठीच झाली. कालच्या दिवसांत या

चरणभेटीचा लाभ घडला नाहीं, तत्संबंधीं राग नाहींना मनांत? असेल तर पदर पसरलेलाच आहे.

**कौसल्या**—नाहींरे बाळा, तुझ्या गळ्याची शपथ, तुझ्या पासून मला राग कां बरें येईल? तूं माझ्याकडेस कधींच चुकला नाहींस.

**श्रीराम**—छिः छिः! मी तसें ह्मणणार नाहीं. जननीच्या चरणांकडेस पुत्राची चूक पदोपदीं आहेच. पुत्र किती जरी समर्थ झाला तरी तो मातेच्या उपकारांतून कधींच उत्तीर्ण होणार नाहीं. पहा, मातेला गर्भभारधारणापासून आणि पोषणापासून जे कष्ट होतात त्या कष्टांला तुलना आहे काय? मातेनें नवमास गर्भधारण करून तन्निमित्त शरीराचें शोषण, सर्वांगीं पांडुरता, पथ्यभोजन, इत्यादि क्लेश निरंतर भोगिले. प्रसूतिकालीं मातेला जी व्यथा उत्पन्न होते तिच्यापुढें मरणकालव्यथा देखील कमीच, पुढें एक वर्ष मलिनशय्या धारण करून तिला शिशुपोषणानिमित्त किती श्रम करावे लागतात? तसेंच प्रौढ वयांत पुत्राचा योगक्षेम निष्कलंक चालविण्याकरितां माता सर्व देवांची प्रार्थना निरंतर करीत असते. पुत्रानें खाद्य, लेह्य, च्योष्यादि मिष्ट पदार्थ भक्षण केले ह्मणजे तेवढ्यानेंच ती तृप्त होत असते. पुत्राच्या आरोग्याकरितां संगृहीत सर्व धनाचा व्यय करण्याकरतां ती मागें पुढें पहात नाहीं. असो. असे अनेक जे मातेपासून घडलेले उपकार त्यांतून एकाद्या उपकाराच्या निष्कृतीकरतां पुत्रानें शंभर वर्षे जरी सेवा केली तरी तो उतराई हो-

णार नाहीं. ज्या देहाच्या आश्रयानें चतुर्विध पुरुषार्थांचें संपादन होतें त्या अतिदुर्लभतर देहाचें जनन, पालन, आणि पोषण जननीपासून होतें मग तिच्या निर्वेशाप्रत हा पुत्र कसा बरें प्राप्त होईल? कधींच होणार नाहीं. तथापि तन, मन, धन आणि वाणी यांच्या योगानें मातेची सेवा निष्कपट तरी यानें केली पाहिजे, ह्मणजे अपराधांपासून तरी मुक्त होईल. जो पुरुष समर्थ असून जननीचें पोषण करीत नाहीं, त्या दुरात्म्याचें मुख देखील पाहूं नये. तो दुष्ट मेल्यानंतर निर्दय यमाचे दूत त्याचेंच मांस त्याच्याकडून खाववितात, तो जीवंत असून मेला. शिव शिव ! त्या पापात्म्याची गोष्ट सुद्धां बोलूं नये. असो. या विस्ताराचें तात्पर्य एवढेंच कीं जननीच्या उपकारार्णवापासून तरून जाणारा पुत्र विरळच आहे. आतां जननीनें मात्र पुत्राची वेडीवांकडी सेवा मान्य करून आपल्या पुत्रास उतराई केलें पाहिजे. मातोश्री, हा माझा देहमात्र तुझ्यापासून उत्पन्न झाला परंतु या देहापासून लवमात्र सुद्धां तुझी सेवा घडली नाहीं. मग याहून चूक ह्मणून दुसरी कोणती राहिली? आतां मी केवल दोन हस्तक आणि तिसरा मस्तक तुझ्या चरणीं समर्पण करितों. एवढ्यानें सेवा परिपूर्ण मानून या पुत्राला उतराई कर ह्मणजे झालें.

**कौसल्या**–( पुत्रास पोटाशीं धरून ) हे जननीचा उद्धार करणाऱ्या पुत्रवर्या, तुझी उत्तीर्णता अद्यापि राहिली आहे काय? जशी पूर्वी वामनाला प्रसवणारी अदिति त्रि-

जगांत धन्य झाली त्याचप्रमाणें तुला प्रसवणारी मी कौसल्या त्रिविष्टपांत धन्य झाल्यें. हे रघुकुलावतंसा, तुझ्या जननानें क्षीरसागरासारखा माझा कुक्षि सत्पुत्र प्रसवणाऱ्या सर्व जननींस वर्णनीय झाला. मी मानवी असून तुझ्या मातृत्वानें देवमातेहून पूज्य झाल्यें. तुझ्या संबंधानें राममाता, रामजननी, रामप्रसू, अशी माझी कीर्ति त्रिलोकीं विस्तृत झाली. मग याहून आणखी उतराई होण्याचें मातृकृत्य कोणतें रे बा राहिलें? तूं जन्माला येऊन माझाच नव्हे त्रिजगाचा देखील उद्धार केलास.

**श्रीराम**—मातोश्री, या वेळीं मी कांहींच बोलत नाहीं. मला क्षुधा फारच बाधा करीत आहे. आधीं पात्राची तयारी होऊं द्या.

**कौसल्या**—रामा, तयारी ह्मणून पुढें व्हायाची आहे काय? नानाप्रकारचे स्वादु आणि मिष्ट पदार्थ सिद्ध करून तुझीच वाट पहात होत्यें.

**श्रीराम**—तर मग विलंब कां करावा! (असें ह्मणून भोजनास बसतो.) आजचें अन्न फारच गोड लागलें. मातोश्री, तुझ्या हातावांचून मला कधींच जेवल्यासारखें वाटत नाहीं.

**कौसल्या**—आतां क्षणभर विश्रांती घे.

**श्रीराम**—आज विश्रांति घेण्यास अवकाश नाहीं. प्राणप्रियेच्या मंदिरांत अवश्य गेलें पाहिजे, नाहींतर ती फार सचिंत होणार आहे. यास्तव मला आज्ञा दिली पाहिजे.

**कौसल्या**—उद्यां तरी खचित येशील ना?

**श्रीराम**—मातोश्री, माझें येणें काय तुला दुर्लभ आहे ? प्रतिदिवशीं एकदां तरी तुझ्या चरणांची भेट घेतल्यावांचून माझ्यानें रहावणार नाहीं. एकाद्या वेळीं कार्यव्यग्रतेमुळें अंतर पडलें ह्मणून तसें नित्य घडेल काय ?

**कौसल्या**—( गहिंवरून ) माझी शपथ घेतल्यावांचून तुला जाऊं देणार नाहीं.

**श्रीराम**— माते तुझ्या गळ्याची शपथ, उद्यां खचित येतों. ( असें ह्मणून पायांवर मस्तक ठेवितो. )

**कौसल्या**—रघुकुलावतंसा, तुझी आयुर्लता वृद्धिंगत असो. पुत्राया, जा तुला आज्ञा झाली.

**श्रीराम**—( सारथ्याप्रत ) अरे सूता, मातोश्रीची आज्ञा तर झाली, आतां विलंब कां करतोस ? अवरोधगृहास अनुलक्षून जाऊं दे रथ.

**सारथी**—आज्ञा महाराज. ( रथ घेऊन जातो ).

---

## प्रवेश २.

### स्थल—अवरोधगृह.

### पात्रें.

श्रीराम ........................... राजा.
सीताबाई ......................... श्रीरामाची पत्नी.
प्रियंवदा ......................... सीतेची दासी.
मनोरमा .......................... सीतेची दासी.

चतुरक ........................सीतेचा सेवक.

विजयक ........................रामाचा सेवक.

**सीता**—बाहेर कोण सेवक आहे?

**चतुरक**—( धाईनें पुढें येऊन ) हा मी चतुरक आहें.

**सीताबाई**— चतुरका, प्राणनाथांची स्वारी अजून आली नाहीं.

**चतुरक**—बाईसाहेब, स्वारी मातोश्रींच्या पादवंदनार्थ पूर्वीं जाणार आणि नंतर त्यांच्या निरोप घेऊन इकडेस येईल असें वाटतें.

**सीताबाई**—कालच्या दिवसांत मातोश्रींची भेट घेतलीच नाहीं काय?

**चतुरक**—नाहीं बाईसाहेब, कालच्या दिवसांत विसावाच मिळाला नाहीं.

**सीता**—एकून सारा दिवस कामांतच गुंग. काम करतांना आपल्या जीवाकडेस देखील पहायाचें नाहीं.

**चतुरक**—तसें कसें घडेल? राजकीय व्यवस्था चालली पाहिजे ना?

**सीता**—चतुरका, तूं त्याचें मला मोठें ब्रह्म करून दाखवूं नको, मलाही समजतें. सारींच कामें स्वतः पाहिलीं पाहिजेत असें नाहीं. लक्ष्मण भावोजी आहेत, भरतादिक आहेत, सुमंत्र प्रधानही आहेत, असें असतां सगळे श्रम आपण सोसावयाचे. आतां बाई आमचा इलाज नाहीं. सांगावयाचें तरी किती ह्मणून?

**चतुरक**—होय साहेब, हें मात्र खरें, ते दुसऱ्याला श्रम देणार नाहींत.

**सीता**—अरे, स्वतः श्रम तरी किती करावयाचे? काल नुकते वनवासश्रमांतून पार झाले आहेत. चवदा वर्षें तर श्रम पाहून आमच्या अंत्रमाळा वाळून गेल्या. त्या श्रमांत आणखी गळव्यावर उठाणुं ह्मणतात तसें माझ्यासाठीं लंकापुरीवर प्रयाण करावें लागलें. त्या प्रसंगीं देवांस पराजय देणारे असे रावण, कुंभकर्ण, इंद्रजित्, देवांतक, नरांतक, अतिकाय, इत्यादि जे रात्रिचर त्यांस मारतां मारतां किती श्रम झाले असतील! चतुरका, आतां तरी काहीं दिवस विश्रांति घेऊं नये काय? तूंच सांग बरें.

**चतुरक**—हें यथार्थच आहे, परंतु बाईसाहेब, अशी चिंता करून काय उपयोग? आतां येतीलच त्या वेळीं विनंति करावी आणि जाऊं देऊं नये.

**सीताबाई**—चतुरका, तूं सांगतोस तें सारें खरें, परंतु आमचें बायकांचें ऐकतें कोण?

**चतुरक**—महाराजांकडून आपल्याकडेस असें होणार नाहीं.

**सीता**—चतुरका, ते सारे व्यर्थ भ्रम आहेत. बरें असो, आतां दिवस किती आला असेल तें पाहून ये.

**चतुरक**—( बाहेर जाऊन येतो. ) दोन प्रहरांचा मान झाला.

**सीता**—जा तर स्वारी येण्यास कां अवकाश लागला तो समाचार घेऊन ये.

**चतुरक**—आज्ञा बाईसाहेब, ( समाचारासाठीं जातो ).

**सीता**—( सचिंत होऊन ) अग, एकंदर दासी कोणीकडे गेल्या ? माझा तर वेळ जाईना आणि ह्या मेल्या दासी कोणीकडे भडकल्या कोण जाणे. ( मोठ्यानें हाक मारते ) अग प्रियंवदे, ( प्रियंवदा व मनोरमा धांवून समोर येतात ).

**प्रियंवदा**—ह्या आह्मी आलों. काय आज्ञा आहे ?

**सीता**—( रोषानें ) अग, तुह्मी असतां तरी कोणीकडे ?

**प्रियंवदा**—बाईसाहेब, उगीच गरीबांवर रोष करूं नका. तुह्मी रागें भरलां तर आह्मीं कोणीकडे जावें ? आतांच मला पुष्पशय्या तयार करण्यासाठीं आज्ञा केली होती ना ? ह्मणून त्या कामासाठीं अंतर्गृहांत गेलें होत्यें. आपल्यास स्मरण राहिलें नसेल.

**सीता**—ठीक, मनोरमा कोणीकडे गेली होती ?

**प्रियंवदा**—स्वारी आतांच येणार या हेतूनें पुष्पमाला, तुरे, गुच्छ, सुगंध तैलें, अंगविलेप, चंदन, अरगजा, कस्तूरी, मृगमद, मेवामिठाई, आदर्श, व्यजन, आणि तांबूलायतन इत्यादि पदार्थ तयार करण्यासाठीं आपणच पाठविलें होतें.

**सीता**—हां, बरोबर, प्राणनाथाच्या वियोगानें चित्त उद्विग्न झाल्यामुळें मला स्मरण राहिलें नाहीं.

**प्रियंवदा**—राणीसाहेब, एक दिवसाच्या वियोगानें अशी उद्विग्नता झाली काय ?

**सीता**—प्रियंवदे, प्राणपतीचा वियोग क्षणमात्र देखील माझ्यानें सोसवेना. मी काय करूं?

**प्रियंवदा**—बाईसाहेब, राग नाहींना येणार? राग न येईल तर बोलेन. नाहीं तर बोलणार नाहीं.

**सीता**—प्रियंवदे, मला राग येणार नाहीं.

**प्रियंवदा**—राणीसाहेब, प्राणनाथांचा एका दिवसाचा वियोग तुह्मांला एवढा असह्य झाला आणि रावणाच्या अशोकवनिकेंत षण्मास पर्यंत कसा सुसह झाला?

**सीता**—( आंसवें आणून ) नको गे नको, त्या वियोगाची आठवण देखील काढूं नको. हर हर! शंभो! अशा तऱ्हेचे दिवस शत्रूला सुद्धां दाखवूं नको.

**मनोरमा**—प्रियंवदे, बाई साहेबांस तो वियोग असह्य होईलच. बाईसाहेबांसह स्वारी ज्या वेळीं वनास जाण्याकरतां निघाली त्या वेळीं आह्मां सर्वांस कसें झालें होतें? ही सारी अयोध्याच जशी काय खायाला येत होती, सर्वांच्या देहांत जीवकला होती किंवा नव्हती याचा देखील संशयच.

**प्रियंवदा**—होयग बाई, पुढें अशा रीतीचे दिवस आमच्या वांट्यास येतील असा भरंवसा नव्हता, परंतु महाराजांच्या आणि बाईसाहेबांच्या पुण्यानें हे दिवस पाहिले.

**सीता**—( गहिंवरून ) प्रियंवदे, त्या वेळींचें दुःख तुला किती सांगूं? त्या निर्दय रावणानें मला भय दाखविण्याकरितां मोठ्या भयंकर राक्षसी पाठविल्या. त्या पापिणी विकराळ मुखें पसरून दाढांवर दाढा आपटून आक्रोश करीत

होत्साल्या खाण्याकरितां माझ्यावर वारंवार झेंपा घालूं लागल्या त्यावेळीं प्राणपतीच्या वियोगानें शुष्क झालेल्या माझ्या तनूपासून भयानें पंचप्राण निघण्यास पाहूं लागले आणि त्या तर 'सीते, आतां खातें तुला' असें ह्मणून माझ्या आंगावर येऊं लागल्या.

**मनोरमा**–( बोटें मोडून ) हा निर्दयांनो, ह्मणूनच महाराजांनीं तुमचा कुळक्षय केला.

**प्रियंवदा**–मग पुढें आपण काय केलें?

**सीता**–मग त्या अतिकाठिण प्रसंगीं प्राणपतीचें ध्यान करण्यास आरंभ केला. प्रियंवदे काय त्या स्वरूपाची अलौकिक शोभा! अहाहा! शरच्चंद्रास लज्जा देणारें असें निष्कलंक तें मुखमंडल, विलास युक्त तें मंदहास्य, भालदेशीं मुक्तादिरत्नांहीं खचित असें स्वर्णमय तें अश्वत्थपत्र, मस्तकीं देदीप्यमान रत्नजडित तो मुकुट, कर्णदेशीं मकराकार तीं कुंडलें, कमलासारखीं टवटवीत तीं आकर्ण नेत्रें, आपादलंबिनी ती वनमाला, परिघासारखे सरल असे ते मनोहर बाहु, कटितटीं तें पीतांबर, दुष्टशिक्षाप्रवीण असें हस्तामध्यें तें सबाण धनु, इंद्रनीलमण्यासारखी ती श्यामल कांति, एवंच अति सुभग आणि मनोहर अशा अवयवांनीं युक्त आणि नूपुरें, अंगदें, कटिसूत्र इत्यादि अलंकारें अलंकृत अशी दर्शनीय प्राणनाथाची ध्यानमय मूर्ति हृदयीं ज्या वेळीं स्थिर केली त्याच वेळीं वियोगजन्य दुःखासह निशाचरींचें भय नाशाला पावलें.

**प्रियंवदा**–मेल्या रावणानें तरी तुह्मांला दुःख देऊन

काय केलें? शेवटीं आपलाच कुळक्षय करून मात्र घेतला. सूर्याच्या डोळ्यांत माती टांकली तर ती उलटी आपल्याच डोळ्यांत पडते आणि डोळे फुटतात. बरें, बाईसाहेब, त्या दुष्टानें असें तुह्मांला दुःख देण्यास कारण तरी कोणतें? आणि वनवासप्रसंगीं महाराज युवराजांसह तुह्मांला कधींच विश्वासीत नव्हते असें असून त्या कपट्याची तरी दांडगाई चालली कशी?

**सीता**—प्रियवंदे, तो वृत्तांत तुला अद्यापि समजलाच नाहीं काय?

**प्रियंवदा**—कर्णोपकर्णीं ऐकला असेल परंतु स्वरूपतः समजला नाहीं. बायकांला सागतें कोण?

**सीताबाई**—आतां तरी सगळें सांगण्यास अवकाश कोठें आहे? परंतु स्वारी येईपर्यंत वेळ गुजरला पाहिजे याकरितां संक्षेपानें सांगत्यें. मनोरमे, तूंही ऐकतेसना?

**मनोरमा**—(उत्कंठित होऊन) हें काय? बाईसाहेबांच्या गोष्टी मिळाल्या तर आणखी काय पाहिजे?

**सीता**—वनवासगमनास आरंभ केल्यापासून भरत भावोजी चित्रकूट पर्वतावर आह्मांला सर्व प्रजांसह भेटले तोंपर्यंत मध्यभागीं घडलेला अतिदुःखकारक वृत्तांत सर्वांस समजलेलाच आहे तो कांहीं तुह्मांला सांगत नाहीं. चित्रकूटाहून पुढें गेल्यानंतर घडलेला वृत्तांत सांगत्यें (मार्गाकडेस पाहून) प्रियंवदे, प्राणनाथांचा रथकेतु अद्यापि नाहींना दिसत?

**प्रियंवदा**—नाहीं, राणीसाहेब, अजून विलंब आहे.

**सीता**—भरत भावोजी निरुपाय होऊन नंदिग्रामीं आल्यानंतर आह्मीं कांहीं दिवस चित्रकूटीं वास केला. त्या वेळीं प्राणनाथांस भेटण्यासाठीं येणाऱ्या लोकांच्या घनदाटी मुळें अयोध्येसारखाच थाट त्या पर्वतींही होऊं लागला या करतां तें स्थान सोडून अत्रिऋषीच्या आश्रमांत आलों. त्या वेळीं त्या ऋषीनें वन्य मूलफलपुष्पादिक पदार्थांनीं प्राणपतीची पूजा करून मोठाच सत्कार केला. मग पतिव्रताशिरोरत्न अशी जी अत्रिपत्नी अनुसूया तिनें मोठ्या प्रीतीनें विश्वकर्मनिर्मित अशीं दोन दिव्य कुंडलें दोन दुकूलें आणि अंगराग मला देऊन ह्मणाली कीं, हे सुंदरि, या अंगरागाच्या योगानें तुझी शोभा कधींच कमी होणार नाहीं आणि तूं पातिव्रत्य धर्मास अनुसरून वागत जा, ह्मणजे तुझ्यासह तुझा पति कृतकार्य होऊन आनंदानें राज्यांत येईल. प्रियंवदे, हें त्या पतिव्रतेचें वरप्रदान शेवटीं माझ्या प्रत्ययास आलें.

**प्रियंवदा**—( आनंदानें ) बाईसाहेब, तुह्मांला जावें त्या ठिकाणीं सर्व लोक वळतात; चांगल्यास सर्वच चांगलें.

**सीता**—पुढें अत्रीचा निरोप घेऊन मार्गावर असणारी घोर नदी अत्रिशिष्यांनीं आणलेल्या नौकेनें तरून निबिड वनांत आलों. नंतर झिल्लिकांच्या झंकारांनीं नादित, सिंह व्याघ्रादिकांनीं व्याप्त, व घोररूप निशाचरांनीं सेवित अशा त्या भयंकर अरण्यांत एक विकटवेष राक्षस अकस्मात् दृष्टीस पडला. पर्वतासारखें त्याचें शरीर, मुखांतून बाहेर सरलेल्या दाढा, डाव्या खांद्यावर शूल, शूलाग्रावर टोंचून

गांथलेली मनुष्यांची माळा, असा तो काजळाच्या डोंगरासारखा भेसुर निशाचर सजीव गज व्याघ्र वनमाहिष इत्यादि बृहज्जीवांला गिळीत होत्साता आह्मांस पहाण्याबरोबर मोठा शब्द करून आमच्या आंगावर लोटला.

**प्रियंवदा**–( कंपित होऊन) अगबाई, अंग सुद्धां शिरशिरलें, बाईसाहेब, अशा रीतीचें अरिष्ट पाहून आपल्यास भय वाटलें नाहीं काय?

**सीता**–विचारतेस काय वेडे? मोठे झुंझार सुद्धां अशाला भितील मग मला स्त्रीला भय न वाटेल कसें? मी त्या वेळीं प्राणनाथास जाऊन मिठी मारली व प्राणनाथ 'जनकनंदिनी भिऊं नको' असें मला अभय देऊन अनुजास ह्मणाले, 'लक्ष्मणा, खबरदार कोदंड सज्ज करून मागें रहा, मी पुढें रहातों, आणि जीवपरमात्मांच्या मध्यभागीं जशी माया असावी तशी आमच्या मध्यभागीं सीता असूं द्या.' असें बोलतात तों तो राक्षस समोर येऊन विचारूं लागला कीं 'जटावल्कल धारण करून हातांत चापबाण वसविणारे आणि माझ्या मुखांत पडलेल्या ग्रासासारखे वाटणारे असे तुह्मी कोण आहांत? या राक्षससेवित वनांत स्त्री बरोबर घेऊन कशाकरतां प्राप्त झालां? तुह्मांला जीविताची आस्था नाहीं काय?' असें त्या निशाचराचें वचन ऐकून प्राणनाथ आपला समूळ वृत्तांत सांगून ह्मणाले, 'अरे दुर्जना, ऋषिहिंसका, तुझ्या सारख्या दुष्टांस शिक्षा देण्याकरितां मुख्यत्वें आमचा संचार आहे. दुष्टा, तुझ्या प्राणवायूचा ग्रास करणारे भुजंगा-

सारखे माझे बाण आले तुझ्यावर, संभाळ आतां' त्या वेळीं राक्षस ह्मणूं लागला, 'अरे मानवाच्या लेका, या विराध राक्षसाला तूं जाणत नाहींस काय? माझ्या भयानें ऋषिसुद्धां या वनामध्यें येत नाहींत. जर तुह्मांला वांचण्याची इच्छा असेल तर चापबाण टाकून दे आणि ही सीता माझ्या स्वाधीन करून पळून जा, नाहींतर तुह्मांला आतांच खाईन' असें मोठ्यानें बोलला आणि विकराळ वदन पसरून मला उचलण्याकरतां जों प्राप्त होतो तों राजीवलोचनानें अनिवार बाण सोडून दोनही बाहु आणि पाय ताडवृक्षासारखे मूळासहित तोडून पृथ्वीच्याठायीं पाडले, आणि तदनंतर अर्धचंद्राकार बाणानें पर्वतशिखरासारखें त्याचें मस्तकही खंडून टाकिलें.

**प्रियंवदा**—हा रांडेच्या मुनिहिंसका, तुला मरण्याचेच डोहळे झाले होते. ( सीतेप्रत ) बाईसाहेब पुढें काय झालें?

**सीता**—या प्रकारें त्या दुरात्म्याच्या देहाचीं शकलें केल्यानंतर मी प्राणनाथास आलिंगन देऊन फार फार प्रशंसा केली. त्या वेळीं स्वर्गांत देवगण आनंदानें दुंदुभी वाजवूं लागले, अप्सरा प्रेमानें नृत्य करूं लागल्या, व गंधर्व गाते झाले. एवढ्यांत त्या विराध राक्षसाच्या देहापासून देदीप्यमान आणि दिव्यवस्त्रालंकारें मंडित असा एक पुरुष उत्पन्न होऊन त्या दयाघनास प्रणाम कारिता झाला आणि नानाप्रकारें स्तुती करून विमानारूढ होत्साता प्रभूच्या आज्ञेनें स्वर्गास जाता झाला.

**प्रियंवदा**—( आश्चर्य करून ) राणीसाहेब, असा दिव्य-वेषधारी तो कोण होता?

**सीता**—अगे, तो विद्याधर दुर्वासशापानें राक्षस झाला होता तो यांच्या बाणानें मरतांच मुक्त झाला.

**प्रियंवदा**—आमच्या महाराजांनीं सगळ्या दुर्जनांला मुक्त केलें. मेले पूर्वीं मात्र द्वेष करीत होते. असो. मग पुढें काय झालें?

**सीता**—पुढें शरभंग ऋषीला मुक्त करून सुतीक्ष्ण आणि अगस्त्य ऋषीचा कनिष्ठ बंधु अग्निजिव्हनामक ऋषि या दोघांलाही भेटून अगस्त्यऋषीच्या आश्रमांत आलों. त्या समयीं अगस्त्य ऋषीनें मोठ्या उत्कंठेनें प्रभूची पूजा करून स्तुति केली आणि जातेवेळीं इंद्रदत्त धनुष्य आणि भाते देऊन ह्मणाला, हे रघुपते, या साहित्यानें भूभारभूत राक्षसमंडलाचा नाश करून विजयी हो, आणि एथून एक योजनाच्या अंतरावर गौतमीच्या तटीं पंचवटी नामक आश्रम आहे, त्या ठिकाणीं सीतालक्ष्मणासह वास करून देवकार्यै कर. असा ऋषीचा निरोप मान्य करून प्रभू पंचवटीस जाण्यासाठीं निघाले. त्या वेळीं मार्गावर पर्वतासारखा एक गृध्र बसलेला पाहून प्रभूस मोठेंच आश्चर्य वाटलें आणि ह्मणाले, लक्ष्मणा, माझें धनुष्य आण, हा कोणी मार्गावर ऋषिभक्षक राक्षस आहे याला एकाच बाणानें ठार करितों असें भाषण ऐकून भयानें कंपित होत्साता तो गृध्रराज प्रभूला आपलें नातें सांगूं लागला. तो ह्मणाला ‘ हे रघूत्तमा,

तुझ्या पित्याचा मी प्रियसखा आहें. मला जटायू ह्मणतात. यास्तव तुला वध्य नव्हें. तुझा मी प्रियकर्ता आहें. माझें रहाणें नित्य या पंचवटींतच असतें. तूं जरी कदाचित् लक्ष्मणास सुद्धां मृगयेस घेऊन गेलास तरी या सीतेचें रक्षण मला पतकरलें. सीतेविषयीं तूं चिंता करूं नको. असें त्या जटायूचें भाषण ऐकून प्रभु संतुष्ट होत्साते त्या गृध्रराजास ह्मणाले, हे जटायो, तूं माझा पितृव्य आहेस काय? शाबास, तसेंच माझें प्रिय करीत जा. असें सांगून त्या जटायूस आलिंगन दिलें आणि पंचवटीस येऊन गौतमीच्या उत्तरतीरीं अतिसुंदर आणि विस्तीर्ण असें वासमंदिर लक्ष्मणाकडून उत्पन्न करवून त्यांत हास्यविनोदानें काळ घालविते झाले.

**प्रियंवदा**—बाईसाहेब, आपण निरंतर राजसौधांत असून नानाप्रकारें सुख भोगणाऱ्या असें असून एकाकी कशा बरें त्या पर्णशालेंत सुखानें होतां?

**सीता**—प्रियंवदे, आह्मांला तें देवसदनच वाटत असे. काय गे, त्या समोरच्या अंगणाची शोभा! आश्रमाच्या चहोंकडेस कदंब, पनस, आम्र, शिरीष, जंबू, निंब, दाडिंब इत्यादि वृक्षांच्या घनदाटीमुळें सूर्याच्या आतपाची बाधा त्या स्थानीं कधींच होत नव्हती. मंद व सुगंध अशा वायूच्या शीतल स्पर्शानें देहगतश्रमाची शांति क्षणांत होत असे. गौतमीजलाच्या स्नानानें मंगलस्नानाहून शतपट आनंद होत होता, लक्ष्मण भावोजींनीं आणलेलीं आणि प्राणनाथांनीं सेवन क-

रून राहिलेलीं कंदमूलफलें अमृताहून विशेष मिष्टता देत होतीं, तसेंच तृणशय्या पुष्पास्तरणशय्येहून विशेष सौख्य करीत होती, व वनांत असणारे मृग पक्षिगण ज्ञातिसुहृज्जनांहून आमच्या ठायीं विशेष प्रीति धरीत होते. एवंच प्राणनाथांच्या नित्य समागमानें जें मला त्या वेळीं सुख वाटत होतें तें आतां देखील नाहीं.

**प्रियंवदा**—बाईसाहेब, असें वाटणें हा महाराजांच्या चरणांचा प्रभाव! असो, मग पुढें काय झालें?

**सीताबाई**—या प्रकारें पंचवटींत कालक्षेप करीत असतां, जनस्थानांत वास करणारी रावणाची भगिनी शूर्पणखा फिरत फिरत गौतमीतीरीं प्राप्त झाली. ती मोठी बलाढ्य आणि कामरूप धारण करणारी होती. तिनें एकाएकीं ध्वज, वज्र, पद्म, अंकुश इत्यादि लक्षणांनीं युक्त अशीं प्रभूचीं पदें वाळूवर उमटलेलीं पाहिलीं, त्याच वेळीं पदांकसौंदर्यानें मोहित होऊन त्या पुरुषाचा शोध करीत मायेनें अतिसुंदर वेष बनवून ती आमच्या आश्रमांत येऊन ठेपली, आणि त्या ठिकाणीं कोटिकंदर्पसौंदर्यानें बनविलेली अशी प्रभूची दर्शनीय मूर्ति पाहून तिला असें वाटलें कीं त्रैलोक्यांतील सौंदर्याचा रस करून ही मूर्ति ओतविली असावी काय? पूर्वीं वाळूवर उमटलेल्या पदांकानेंच ती इतकी मोहित झाली होती. आणि प्रत्यक्षतः तें मनोहर रूप पहाण्याबरोबर मग विचारतां काय? कामबाणानें अगदींच विकल होत्साती प्रभूच्या समोर मर्यादा सोडून बोलती झाली. हे पु-

रुषरत्ना, तूं कोण आहेस आणि ऋषिवेष धारण करून या राक्षससेवित वनांत कां वास केलास तें मला सांग. आतां मी कोण ह्मणशील तर मी कामरूप धारण करणारी राक्षसी रावणाची भगिनी. मला शूर्पणखा ह्मणतात. हें वन आमच्या राजानें मला दिलें या करतां ऋषींचें भक्षण करून खरासह याच वनांत मी रहाल्यें. एवढा माझा वृत्तांत. या प्रकारें त्या राक्षसीचें वचन ऐकून विस्मित होत्साते प्रभु आपलें नांव सांगून ह्मणाले कीं, मी अयोध्याधीश जो राजा दशरथ त्याचा पुत्र आहें. ही जनकराजतनया सीता माझी धर्मपत्नी आणि माझा कनिष्ठ बंधु लक्ष्मण तो फलमूलें आणण्याकरतां वनांत गेला आहे. आह्मी त्रिवर्ग पित्राज्ञेच्या पालनासाठीं या वनांत राहतों. हे सुंदरी, तूं आह्मांला कां विचारतेस? आणि आमच्याकडे तुझें कोणतें कार्य आहे तें सांग. असें प्रभूचें वाक्य ऐकून ती शूर्पणखा ह्मणतीझाली कीं, हे नर-वैदुर्या, हे भुवनसुंदरा, त्रैलोक्यांत अद्वितीय असें तुझें सौंदर्य पाहून मी अत्यंत मोहित झाल्यें; कमलनेत्रा, तुला सोडून जाण्यास मी समर्थ नाहीं. हा दुष्ट मदन मला फारच पीडा देत आहे, या करितां माझ्या बरोबर गिरिकंदरांत जर येशील आणि माझ्याशीं रमशील तर मला वांचविलेंसें होईल. (कंपित होऊन) नाहींग बाई हा निर्दय मदन मला थारा देत.

**प्रियंवदा**—( तोंडांत बोट घालून ) बाईसाहेब, तुह्मी जवळ असतां महाराजांपुढें अशी अमर्यादा केली नव्हे? हा रांडे निर्लज्जे!

**सीता**—अग, त्या वेळीं प्राणनाथ सुद्धां लाजल्यासारखे झाले, परंतु तसल्या दांडगीस करतात काय? असो, नंतर प्रभु भ्रूसंकेतानें मला दाखवून ह्मणाले कीं, ही माझी धर्मपत्नी माझ्याबरोबर आहे. हिला आणि तुला कसें पडेल? तूं सापत्न्यमत्सरानें फारच दुःखित होशील. या करतां तुला एक युक्ती सांगतों. माझा कनिष्ठ बंधु लक्ष्मण माझ्याच सारखा दर्शनीय असून तो या वेळीं कंदमूलफळें आणण्याकरतां वनांत गेला असेल. तो तुला योग्य आहे. त्या ठिकाणीं तूं जा आणि त्याला भर्ता कर. असें ऐकून ती लक्ष्मण भावोजी होते त्या ठिकाणीं गेली, आणि काममोहित होऊन त्यांस ह्मणाली कीं, हे पुरुषश्रेष्ठा, तुला पाहून मी अत्यंत कामवश झाल्यें या करतां तूं माझा पति हो. या कार्याविषयीं ज्येष्ठ बंधूचीही आज्ञा तुला आहेच आतां विलंब कशासाठीं करतोस? या गिरिगुहेंत उभयतां जाऊन रमूं. त्या वेळीं लक्ष्मण भावोजी सलज्ज होऊन त्या निर्लज्जेस ह्मणाले कीं, हे सुंदरी, तुझें ह्मणणें यथार्थ आहे. परंतु ज्यानें तुला माझ्याकडेस पाठविली त्याचा मी दास आहें. जर तूं मला वरशील तर त्याचीच दासी होशील. मग हें केवढें बरें तुला दुःख होईल? हे साध्वि, तूं आतां पुनरेव त्याच्याकडेसच जा ह्मणजे तो त्रैलोक्याचा स्वामी आहे, त्यानें तुला वरली ह्मणजे तूं त्रैलोक्याची स्वामिनी होशील, मी ही पाहिजे तर तुझ्या मागोमाग येतों. असें भावोजींकडून प्रत्याख्यान होतांच, मोठ्या कोपानें ती प्रभू होते त्या स्थानीं आली आणि पुढें

उभी राहून नांवानें हाक मारून ह्मणाली ‘ अरे मला इकडे तिकडे कां हिंडिवतोस? तुला ही सीता बायको आहे ह्मणून माझी गरज नाहीं ? एवढेंच ना ? चिंता नाहीं ? आतां या सीतेलाच तुझ्या समक्ष गिळून टाकत्यें ह्मणजे मग तरी मला वरशील ?’ असें बोलून पापिणीनें आपलें भयंकर पूर्वरूप धारण केलें आणि माझ्या आंगावर आली.

**प्रियंवदा**–( बोटें मोडून ) अग रांडे, आतां तुझ्या आयुष्याची दोरी तुटली !

**सीता**–त्या वेळीं प्राणनाथांनीं खुणा करण्याबरोबर लक्ष्मण भावोजींनीं तिचे केश वामहस्तानें बळकट धरून तीक्ष्णधार अशा खड्गानें दोनही कर्ण आणि नासिक एकदम खंडून टाकिलीं, मग पर्वतांतून जसे पर्जन्यकालीं झरे उत्पन्न होतात तसे दोनही कर्णरंध्रांपासून आणि नासाबिलापासून रक्ताचे प्रवाह उत्पन्न झाले त्या रक्तस्रावानें आर्द्र होऊन कठोर स्वरानें आक्रोश करीत होत्साती ती शूर्पणखा खराच्या पुढें कपाळ आपटून लोळती झाली. त्या वेळीं मोठ्या आवेशानें तो खर विचारूं लागला ‘ हे भगिनी, अशी तुझी दुर्दशा कोणी केली? कोणाला हे मृत्युमुखांत प्रवेश करण्याचे डोहाळे उत्पन्न झाले, त्याचें नांव सांग; तो प्रत्यक्ष काळ जरी असला तरी एका क्षणांत त्यास ठार मारून टाकीन.’ असें त्या खरानें आंश्वासन देतांच शूर्पणखा आपला घडलेला वृत्तांत सांगून ह्मणाली ‘ जर तूं उत्तम कुलांत उत्पन्न झालेला आहेस तर त्या दोन्ही शत्रूंस मारून टाक ह्मणजे

त्यांच्या रक्ताचा घोंट घेऊन मांसभक्षणानें तृप्त होईन आणि हें जर तूं करीत नाहींस तर आतांच प्राणाचा त्याग करत्यें.' असा त्या नकटीचा निर्बंध पाहून तो पराक्रमी खर राक्षस दूषण व त्रिशिर यांच्यासह चौदासहस्र बळकट राक्षस बरोबर घेऊन प्राणपतींच्या प्रतापाग्नींत पतंगासारखा भस्म होण्याकरतां प्राप्त झाला. त्या प्रसंगीं त्यांचा कोलाहल कर्णी पडतांच इकडेसही मोठाच आवेश आला. त्या वेळीं लक्ष्मण भावोजीही त्या निशाचरांस मारण्याकरितां उत्कंठित होते, परंतु त्यांस शपथ घालून माझ्या रक्षणास ठेविलें आणि आपण चापबाण घेऊन युद्धास तयार झाले. इतक्यामध्यें ते खरादिक चौदासहस्र राक्षस चहूंकडून एकट्यांवर नानाप्रकारचीं आयुधें आणि वृक्षपाषाण इत्यादिकांची एकदम वृष्टि करते झाले. त्या वेळीं प्रभू त्या राक्षस सेनेवर कुपित होऊन संघशः तीक्ष्णबाणांच्या भडिमारानें निशाचरांचीं सहस्रशः शिरकमलें भूलिंगास अर्पण करून एकाच प्रहरार्धानें खर दूषण आणि त्रिशिरा यांलाही यमलोकाचे अतिथि करून आमच्या समीप आले.

**प्रियंवदा**—हा दुष्टांनो! प्रभूवांचून आणखी कोण तुमचीं हाडें मोडणार होता? हें ऋषिहिंसा केल्याचें फल तुझाला प्राप्त झालें.

**सीता**—त्या वेळीं विजयश्रीयुक्त प्राणनाथांचें मुखपंकज पाहून मला जो आनंद झाला तो ब्रह्मांडांत देखील मावेनासा झाला. मग प्रभूला प्रेमभरानें आलिंगन देऊन रि-

पूंच्या शस्त्रास्त्रांनीं उत्पन्न झालेल्या व्रणांचें मार्जन करायास बसल्यें. इकडेस शूर्पणखा आपले पक्षपाती जे खरादिक रात्रिंचर त्यांच्या हननानें विव्हल होत्साती लंकेस जाऊन राक्षसकुलाचा राजा जो लंकाधीश रावण त्याच्या पुढें मोठ्यानें आक्रोश करून रडूं लागली. रावणानें आपल्या भगिनीची तशा प्रकारची दशा पाहून कोपाकुलित होत्साता वृत्तांत विचारूं लागला, 'वत्से भगिनि, अशी तुझी दुर्दशा कोणीं केली? इंद्रानें, कीं वरुणानें, कीं कुबेरानें, कीं यमानें केली? बोल, बोल लवकर, त्या दुष्टास एकाच क्षणांत कृतांतपुरीचा अतिथी करितों' असें रावणाचें वचन ऐकण्याबरोबर त्या नकटीस फारच कोप येऊन ती बोलूं लागली. 'अरे, तुझ्या राज्याला धिक्कार असो! तूं मद्यपान करून स्त्रियांशीं क्रीडा करीत असणारा, तुला स्त्रीविजिताला राज्य कोणीं सांगितलें आहे? हे उन्मत्ता, कोणीकडे काय होतें हें तुला ठाऊक नाहीं. राजे चारचक्षूंच्या योगानें असतील त्या ठिकाणीं पृथ्वींतील सर्व वृत्तांत जाणतात, आणि तूं राजा असून चारदृष्टींवांचून आहेस, यावरून तुला अंध ह्मटलें तरी चालेल. अरे, वृथागर्व धारण करणाऱ्या नपुंसका, जनस्थानीं एका मानवानें चौदा सहस्र राक्षसांसह खरदूषण व त्रिशिर यांचा सप्पा उडवून माझीही दुर्दशा त्यानेंच केली. आतां जनस्थानांत जाण्यास कोणत्या निशाचराची माय व्याली आहे? ऋषि पाहिजे त्या ठिकाणीं सर्वकाल निर्भय संचार करीत आहेत. या प्रकारें घडलेला तुझाच अ-

पकर्ष मूढा तूंच जाणत नाहींस आणि मी राजा मी राजा ह्मणून मोठ्या गर्वानें फुगतोस. अरे, तुझ्या राजत्वाला धिक्कार असो!' असें त्या दुर्भगेचें निर्भर्त्सनायुक्त वचन ऐकून लज्जित होत्साता रावण आपल्या भगिनीस ह्मणाला, 'हे भगिनी, तो मानव कोणाचा कोण व त्यानें तुला अशी विरूप कां केली आणि राक्षसांचा क्षय करण्यास प्रयोजन काय हा वृत्तांत एकवार सविस्तर सांग ह्मणजे त्या मानवांचा समूळ घात आतांच करून टाकितों' असें रावणानें विचारतांच ती राक्षसी आमचा अखिल वृत्तांत सांगून ह्मणाली, हे बंधो, त्या मानवाची स्त्री साक्षात् लक्ष्मीसारखी मी अवलोकन केली त्या वेळीं देव गंधर्व नागादिकांच्या स्त्रिया तिच्या पुढें अतितुच्छ वाटल्यामुळें ती स्त्री तुला मिळावी असें माझ्या मनांत त्याच वेळीं आलें. मग ती बलात्कारें आणावी या हेतूनें तिला उचलण्यास उद्युक्त झाल्यें असतां ज्येष्ठबंधूनें कनिष्ठास आज्ञा करून त्याच वेळीं नासाकर्ण खंडिले आणि अशी रे दादा माझी अवस्था केली. नंतर हा वृत्तांत खराला सांगतांच तोही मोठ्या कोपावेशानें अंध होऊन त्या मानवांशीं संग्राम करण्याकरितां सेनेसहित आला परंतु एक त्रुटि सुद्धां न लागतां तो त्याच्या प्रतापाग्नींत कर्पूरासारखा राक्षसांसह भस्म झाला. दादा, मला असें वाटतें कीं तो मानव जर मनांत आणील तर एका निमिषार्धानें त्रैलोक्याचें भस्म करील यांत संदेह नाहीं. हे राक्षसपते, जर ती भुवनसुंदरी सीता तुला मिळेल तरच तुझें राज्य व जीवित्व स-

फल होईल. बंधुराज, आतां तुला एक हिताची गोष्ट सांगत्यें, जर तूं सीता आणण्याचा प्रयत्न करणार तर कापट्यानें रूपांतर करून जा. खऱ्या रूपानें जाशील तर माझ्या सारखा फसशील.

**प्रियंवदा**–(रोषानें) हा रांडे दुष्टे, आमच्या स्वामिणीच्या हरणास तूं सूचक झालीस काय? हे विघ्नसंतोषिणी, या पापाचरणाचें फळ महाराजांनीं तुला पूर्वींच दिलें. मी आणखी तुला काय ह्मणूं.

**मनोरमा**–( रागानें कंपित होऊन ) देवा, त्या पापिणीला जाईल त्या ठिकाणीं अन्न देऊं नको.

**सीता**–(हंसून) अग, ती सठवी आतां आहे कुठें, उगीच आतां तिच्यावर कां तुह्मी कोपतां? असो, पुढें ऐका. रावणानें भगिनीस आधीं आश्वासन दिलें आणि नंतर मोठ्या चिंतेनें व्याप्त होऊन रात्रौ प्रभूच्या पराक्रमाचें चिंतन करीत होत्साता मोठ्या कष्टानें रात्रि कंठिता झाला. प्रातःकाल होतांच रथारूढ होऊन मारीच राक्षसाच्या सदनीं आला. व सर्व वृत्तांत त्या निशाचराला सांगून ह्मणाला 'मामा, त्या मानवांनीं अपराधावांचून निर्दोष अशा माझ्या भगिनीचे नासाकर्ण कापून जनस्थाननिवासी सर्व राक्षसांचा नाश केला. यास्तव त्या उन्मत्त मानवांची भार्या तुझ्या साहाय्यानें ते आश्रमांत नसतां हरण करावी या हेतूनें मी तुझ्या घरीं आलों आहें. तर तूं मायेनें सुंदर मृगवेष धारण करून त्यांच्या आश्रमांत जा ह्मणजे ते दोघेही बंधु मोहित होऊन

तुझ्या मागून जातील आणि त्याच वेळीं मी सीतेचें हरण करीन’ असें रावणाचें घोरतर वाक्य ऐकून मारीच ह्मणाला ‘हे राक्षसेंद्रा, ही कुलनाशकारक बुद्धि तुला कोणी सांगितली? अशी बुद्धि देणारा तो तुझा नाश करणारा शत्रूच होय. अतएव तो तुला वध्य आहे. अरे, त्या रघूत्तमाच्या पराक्रमाचें स्मरण झालें ह्मणजे माझें चित्त अद्यापि उचंबळ होतें. तो पराक्रमाचा केवळ निधीच ह्मणावयाचा. त्याच्याशीं कोण रे बाबा द्वेष करील? रावणा, तो साक्षात् परमेश्वर आहे, त्याला तूं अनन्य भावानें भजावें तें सोडून त्याच्याशीं द्वेषबुद्धी धारण करतोस हें सर्वप्रकारें तुला योग्य नव्हे. असा मारीच्याचा तारक उपदेश त्या मरणोत्सुकाला न आवडून मोठ्या कोपानें तो दुष्ट मारीचास ह्मणाला, ‘त्याचे पराक्रमविचारण्यासाठीं मी तुझ्याकडेस आलों नाहीं. तूं येतोस किंवा नाहीं एवढें मला सांग. जर तूं येत नाहींस तर या सपाट्यानें तुझी डोचकी याच वेळीं छाटून टाकतों’ असें त्या दांडग्याचें वचन ऐकून मारीचानें मनांत विचार केला कीं राक्षसाकडून मरावें त्याहून परमेश्वराच्या हातानें मेल्यावर फार चांगलें, असा निश्चय करून रावणास ह्मणाला ‘राजा, माझा हितोपदेश जर तुला आवडत नाहीं तर मी आज्ञेप्रमाणें तुझ्या कार्याकरितां मरण्यास सिद्ध आहें.’ असें बोलून उठला. मग दोघेही रथारूढ होऊन आमच्या आश्रमाच्या समीप आले, त्या वेळीं त्या मारीच्यानें विचित्र मृगवेष धारण करून तो अंगणात इतस्ततः फिरूं लागला. प्रियंवदे,

कायग त्या मृगाचें सौंदर्य तुला सांगूं! शुद्ध सुवर्णासारखी त्याची कांति, सर्वांगावर रौप्यबिंदु, रत्नाचीं शृंगें, चरणही तसेच, नील रत्नाचीं नेत्रें, सौदामिनीसारखी अंगप्रभा, या प्रकारें सर्व सौंदर्याचा ठेवाच असा तो मायामृग अतिचपलत्वानें आमच्या अंगणांत माझ्या दृष्टिसंमुख ज्या वेळीं संचार करूं लागला त्या वेळीं प्रियंवदे तुला काय सांगूं, कुठची बाई माझ्या मनास भुल पडली कोण जाणे, मी लज्जा सोडून प्राणपतींची प्रार्थना केली कीं ‘ हे प्राणनाथ, हा विचित्र मृग मला खेळण्यासाठीं दिला पाहिजे. महाराज, एवढी या दासीची आळ आपण पुरवूं नये काय?’ अशी माझी प्रार्थना ऐकून प्रभूला मारीचमाया असें जरि समजलें तथापि मारीच असला तर मारीन आणि मृग झाला तर सीतेच्या विश्रांतीसाठी आणीन असा विचार करून धनुर्बाणासह मृगामागून प्रयाण केलें.

**प्रियंवदा**–बाईसाहेब हा तुमचा घात तुह्मीच केला तर.

**सीता**–( सुसकारा सोडून ) अगबाई, दैवानेंच बुद्धि फिरविली, मग त्याच्या पुढें इलाज कोणाचा? प्रियंवदे, एवढ्यानें तरी काय झालें? पुढें ऐक दैवगतीची विचित्रता. तो विचित्र मृग प्रथमत: अतिसमीप भासावा, क्षणांत धांवून दूर जावा, क्षणभर दिसूंच नये, पुनरेव दूर देशीं दिसावा, एवंच प्रभूला मोहून दूर घेऊन गेला, त्याच वेळीं प्रभू हा स्पष्ट राक्षस आहे असें समजले आणि आकर्ण धनुष्य ओढून बाण सोडिला, तो त्या राक्षसाच्या मर्मस्थानीं बसून रक्त

ओकीत होत्साता भयंकर पूर्वरूप प्रकट करून पडला, आणि मरत असतां मोठ्या आर्त स्वरानें 'हे लक्ष्मणा, धांव धांव लवकर, मी या वेळीं मोठ्या संकटांत आहें' अशी प्रभूसारखी वाणी काढून ओरडला आणि प्राण सोडिले. मी त्या वेळीं दुःखानें व्याकूळ होऊन, लक्ष्मणास ह्मणाल्यें, हे लक्ष्मणा, बंधूचा आर्तस्वर ऐकला नाहींस काय? आतां कां विलंब करतोस? त्या वेळीं लक्ष्मण ह्मणाला, माते, तूं भिऊं नको, ही सारी राक्षसमाया आहे. प्रभूला राक्षसांपासून संकट होईल काय? असें झालें तर सर्प सुद्धां गरुडाचा नाश करील? असें लक्ष्मणाचें वचन ऐकतांच माझ्या दुर्दैवानें मला कोप आणला आणि त्या वेळीं त्या सात्विकास जीं मी दुर्भाषणें बोलल्यें त्यांचा उच्चार देखील माझ्यानें करवत नाहीं नंतर त्या दुष्ट शब्दांनीं विव्हल झालेला लक्ष्मण मला रागानें ह्मणाला, हे कोपवति, मी तुझ्या सेवेविषयीं तत्पर असतां अशा शब्दबाणांनीं माझें हृदय टोंचतेस काय? छिः, तुला धिक्कार असो! या बुद्धीनें तुझा नाश होईल. असें बोलून लक्ष्मण गहिंवरला आणि माझें रक्षण करण्यास वनदेवतांस सांगून दुःखानें आसवें ढाळीत प्रभूपाशीं गेला. तदनंतर तो कपटी रावण भिक्षुवेषानें दंड कमंडलु हातीं घेऊन माझ्या समीप आला. त्या वेळीं तो कोणी मुनीच असेल अशा भावानें मीं त्या पाप्याचा कंदमूलफलें देऊन बराच सत्कार केला आणि सांगितलें, हे मुनिराज, आपलें कांहीं इष्ट असेल तर आतांच घरीं येतील तों पर्यंत मर्जी

असल्यास स्वस्थ बसावें. नंतर त्या कपट्यानें आमचा अरण्यसंचारादि वृत्तांत विचारून घेतला आणि तुह्मी कोण आहांत असें विचारतांच तो दुष्ट कपटी आपला वृत्तांत सांगूं लागला. तो ह्मणाला, हे सुंदरी जनकराजकन्ये, मी कोण हें तुला समजलें नाहीं काय? मी संपूर्ण राक्षसांचा राजा देवांचा शास्ता व पौलस्त्याचा पुत्र ज्याची रावण अशी सर्व जगांत प्रसिद्धि तोच मी आहें. हे हरिणाक्षि, तुझ्या सौंदर्याची कीर्ति ऐकून तुला नेण्याकरितां या ठिकाणीं आलों इत्यादि अमर्याद भाषणें तो खल बहुतच बोलला तीं काहीं माझ्या मुखांतून येत नाहींत. असो '**विष्णवे नमः**' त्या कपट्याचें भाषण तप्तधातूच्या रसासारखें कानांत पडतांच मला अत्यंत दुःख वाटलें आणि भयानें सर्वांगास कंपही सुटला. देवा, आतां करूं तरी काय, कोणाला हें दुःख सांगूं? कोण माझा या संकटांत उडी घालणारा पक्षपाती आहे? हाय हाय! हे मम प्राणजीवना राजीवाक्षा, या तुमच्या चरणदासीची या वेळीं उपेक्षा करितां काय? आपल्या किंकरीला या काळापासून कां सोडवीत नाहीं? एवंच बहुप्रकारें शोक करीत असतांही तो खल आपल्याबरोबर येण्याविषयीं दुराग्रह ज्या वेळीं करूं लागला त्या वेळीं मला अत्यंत रोष आला आणि त्या दुष्टास ह्मणाल्यें, अरे पापिष्ठा, अशीं अनर्गल भाषणें जर पुनः बोलशील तर राघवापासून तुझा नाश होईल. हे कपट्या, माझें धर्षण करण्यास कोण रे समर्थ आहे? मूर्खा, ही सिंहाची भार्या तुला

शशकाला पचेल काय? अरे अधमा, क्षणमात्र या ठिकाणीं रहा. अनुजासह प्राणेश्वर आतांच येतील. दुष्टा, ज्या वेळीं त्या राक्षसवंशकाननाच्या दावाग्नींत सांपडशील आणि त्याच्या तीक्ष्ण शरांनीं भिन्नहृदय होत्साता तोंड वासून भू-शय्येवर पडशील त्याच वेळीं राघवाच्या पराक्रमाचा प्रतिघात तुला समजेल. अरे मूर्खा, यजमान आश्रमीं नाहींत अशी सं-धी पाहून आलास काय? पापिष्ठा, हा यज्ञिय पुरोडाश तुला श्वानाला स्पर्श करण्यास योग्य नाहीं. असें असून जर दांड-गाई करशील तर आतांच प्राणाला मुकशील, अशी माझ्या पासून झालेली निर्भर्त्सना त्या दुष्टाला असह्य होऊन त्यानें पर्वताएवढें आपलें स्वरूप प्रकट केलें; दहा तोंडें, वीस बाहु कालमेघासारखी कांति, असें तें भयंकर अरिष्ट पहाण्याबरो-बर वनदेवता भयानें वित्रस्त होऊन पळूं लागल्या. इतक्यांत त्या दुरात्म्यानें नखांनीं भूमी उकरून वीसही बाहूंनीं मला उचलली आणि लंकेचा मार्ग अनुलक्षून जाऊं लागला.

**प्रियंवदा**–( डोळ्यांत पाणि आणून ) हाय हाय! देवा काय ही विपत्ति! दैवानें थोरांला सुद्धा सोडिलें नाहीं.

**सीता**–नंतर माझ्या शोकभराचें आक्रंदित जटायूच्या कर्णांत पडण्याबरोबर तो जटायु माझ्या कैवारानें त्या दुष्टा-बरोबर युद्ध करून मरण पावला. नंतर मला त्या तस्करानें लंकेतील अशोकवनांत नेऊन शिंशपावृक्षाखालीं राक्षसीं-मध्यें ठेविलें. इकडेस लक्ष्मणानें अग्रजास भेटून दुःखानें घडलेला मजकूर निवेदन केला त्या वेळीं प्रभूंनीं तूं स्त्रीभा-

षणाचा राग मानून अनुचित कर्म केलेंस असा लक्ष्मणास शब्द लाविला व आश्रमांत आले आणि पहातात तों मी नाहीं. त्या वेळीं ते ज्ञानी असतांही त्या दुर्भर शोकपर्वतानें चिरडून 'हा सीते, हा सीते' अशा आर्तस्वरानें आक्रोश करते झाले.

**प्रियंवदा**—कसाग बाई महाराज शोक सहन करतील ? हातचे हातींच रत्न हरपलें.

**सीता**—प्रियंवदे, तुझी समाधानी होण्याकरितां रावणानें मला नेण्याचें कारण तुला संक्षेपानें सांगितलें. पुढें प्राणपतीनें माझ्या वियोगाग्नीनें तप्त होऊन जिकडे तिकडे माझा शोध करून निराश झाले आणि नंतर सुग्रीवाशीं सख्य करून त्याचा शत्रू जो वाली त्यास मुक्ति दिली आणि त्या सुग्रीवास किष्किंधाराज्यीं अभिषिक्त करून नंतर त्या वानरराजासह मर्कटसेना बरोबर घेऊन लंकेवर प्रयाण केलें आणि रावणाचा पुत्रपौत्रादिपरिवारासह क्षय करून माझ्यासह आनंदानें कुबेरप्रेषित पुष्पकविमानांत बसून अयोध्येस आले. ही पुढील कथा विस्तारानें सांगण्यास या वेळीं अवकाश नाहीं पुढें अवकाशानुसार सांगतां येईल. ( इतक्यांत लगबगीनें चतुरक येतो आणि प्रणिपात करतो )

**चतुरक**—स्वामिणीचा जय असो !

**सीता**—काय रे चतुरका, स्वारी आली काय?

**चतुरक**—होय ? बाईसाहेब. वेदध्वनीसारखा श्रवणीय आणि अमंगलनाशक असा रथाचा नाद सुद्धां ऐकू येतो.

**सीता**–(आनंदानें) दासींनो, स्वारी आली हां, तुमची सर्व तयारी असूंद्या, नाहीं तर माझ्या कडून आयत्या वेळीं बोलून घ्याल.

**प्रियंवदा**–बाईसाहेब, तयारीविषयीं चिंता नाहीं. स्वारीच एकदां येऊंद्या ( इतक्यांत रथ समोर येतो. श्रीरामराजा सेवकाचा हात धरून रथाखालीं उतरतात व अवरोधगृहांत जातात. सीता आसनावरून उठले.)

**श्रीरामराजा**–प्राणप्रिये, एका बाजूसच कां राहिलीस? रोष नाहींना आमच्यावर?

**सीता**–रोष कशाचा? बायकांचा रोष आधीं उपयोगी काय? त्या मेल्या मुळींच अबला त्यांला विचारतें कोण?

**श्रीराम**–छिः! हें काय बोलणें? बायको ह्मटली ह्मणजे पुरुषाचें अर्ध होय. तिच्यावांचून पुरुष अपूर्ण मानिला जातो. पहा, जानकी, ज्या स्त्रीच्या आश्रयानें अतिदुर्जय कामादि शत्रु जिंकलेजातात, धर्म अर्थ काम इत्यादिक पुरुषार्थांच्या संपादनाविषयीं जिच्यावांचून पुरुषाला दुसरा सहायी नाहीं. जिच्या समागमानें पुरुष गृहस्थ बनून तीनही आश्रमाप्रत अन्नादिदानानें तारतो व आपणही तरतो त्या गृहिणीवांचून काय होणार आहे? हे कोमलांगि, जशी सागरापासून तारणारी नौका तशीच दुःखापासून तारणारी स्त्री यांत संदेहच नाहीं. 'नास्ति भार्यासमं सुखं' गृहिणीसारखें दुसरें सुखच नाहीं. पहा, प्रिये, अरण्यांत वृक्षमूलाखालीं असून जर त्या ठिकाणीं स्त्री आहे तर तेंच त्या पुरुषाचें घर आणि

जर स्त्री नाहीं तर राजगृह असतांही अरण्य ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं. 'यस्य भार्या गृहे नास्ति सापि चेत्प्रियवादिनी। अरण्यं तेन गंतव्यं यथारण्यं तथा गृहं' एवंच स्त्रीवांचून पुरुषाला गतीच नाहीं. असें असतां आह्मांला विचारतो कोण असें तुझें ह्मणणें कसें बरें संभवेल? स्त्रीच्या उपकारांपासून पुरुष कधीं तरी उत्तीर्ण होईल काय?

**सीता**—थोडक्याशा बोलण्यास किती तरी विस्तार? आह्मांला बाई पुरुषांसारखें कुठें बोलायला येतें आणि अशीं बाहेरून गोड भाषणें तरी पाहिजेत कोणाला?

**श्रीराम**—एकून तूं माझ्यावर रुष्ट आहेस, मला धोरण समजलें (प्रियंवदेकडेस वळून) प्रियंवदे, तुमची स्वामिणी कां बरें माझ्यावर रुसली?

**प्रियंवदा**—(कौतुकानें) सरकार, स्वामिणीस कोप येण्याचें मला कांहींच कारण दिसत नाहीं. आपले पंचप्राण बाईसाहेबांवर असतां त्या कां बरें रुष्ट व्हाव्या?

**श्रीराम**—प्रियंवदे, तूं जरी तसें ह्मटलेंस तरी प्रिया खचितच रुष्ट आहे. हे पहा, मुखपंकजांत असणारे प्रवालवल्लीसारखे आरक्त जे ओष्ठप्रांत ते रोषानें कसे स्फुरत आहेत, फार वेळ मंदहास्य नसल्यामुळें हीरकासारख्या दंतपंक्तीची प्रभा फांकली नाहीं, मदविव्हल झालेल्या नेत्रांमध्यें रोषावेशानें आरक्तपणा विशेष दिसतो, वारंवार वक्र होणाऱ्या भ्रुकुटी पाहिल्या असतां कोपानें मदनाचेंच धनु भग्न केलें काय असा भास होतो. अहाहा! मंदवायूनें जशी कदली कांपत असावी

तद्वत् कोपानें या सुंदरीचीं सर्व गात्रें कांपत आहेत. यावरून ही चंचलाक्षी रुष्ट नाहीं असें ह्मणतां येत नाहीं, आणि तूं तर नित्य जवळ असणारी असून स्वामिणीच्या कोपाचें कारण समजलें नाहीं ह्मणतेस हें मोठें आश्चर्य आहे.

**प्रियंवदा**–( स्मृतीवर आल्यासारखें करून ) हां! समजलें. बाईसाहेब काल उत्कंठित होऊन वाट पहात होत्या. परंतु येणें जाहलें नाहीं हेंच रोषाचें कारण असेल?

**श्रीराम**–प्रियंवदे, एवढ्यानें कोप यावा काय? अग, ही प्रिया जशी माझ्याविषयीं उत्कंठित आहे तसा मीही प्रियेविषयीं उत्कंठित आहें. परंतु करूं काय? कालच्या दिवसांत मला येण्याविषयीं अवधि सांपडला नाहीं (सीतेकडेस वळून) प्रियतमे, एवढेंचना कोपाचें कारण? कीं यावांचून आणखी कांहीं आहे?

**सीता**–हेंच कशाला पाहिजे? परवां शिकारीस जातेवेळीं माझ्या मनांत बरोबर यावें असें होतें. म्यां दासीकडून सूचना देखील करविली परंतु मला नेतें कोण?

**श्रीराम**–प्राणप्रिये, ती सूचना मला स्पष्ट समजली नाहीं.

**सीता**–झालें. समजली नाहीं ह्मटलें ह्मणजे काम गुजरलें.

**श्रीराम**–बरें, अरण्यांत शिकारीकरतां जें जाणें त्यांत तुला सुख तरी कोणतें?

**सीता**–अरण्यांत सुख कशाला पाहिजे? बरोबर जाण्याचें सुख.

**श्रीराम**–हे मृगलोचने, बरोबर जाण्याचें सुख खरें, परंतु

तुझ्यासारख्या सुकुमार स्त्रियेला अरण्यांतील मृगमारणादिक कर्कश गोष्टी जर सांगितल्या तर त्या देखील दुःसह होणार, मग प्रिये, प्रत्यक्ष अरण्यगमनादिक श्रम कसे बरें सुसह होतील?

**सीता**—आतांच मी सुकुमारी झाल्यें, मागें चौदावर्षें वनवास केला त्या वेळीं मात्र सुकुमारता नव्हती.

**श्रीराम**—बरें असो, शब्दावर प्रतिशब्द तुझा आहेच. तूं कांहीं बोलून हटणार नाहींस. यास्तव तूं जें या वेळीं बोलशील तें मला मान्य केलें पाहिजे.

**सीताबाई**—आपल्याकडून गोष्ट गेली, मग बोललेलें मान्य केलें ह्मणून आश्चर्य कोणतें?

**श्रीरामराजा**—प्रियतमे, एकून मी अपराधी असें तुझ्या मनांत ठरलें. तर मग अपराध्यास दंड केलाच पाहिजे, मग दंडाविषयीं उशीर कां करतेस?

**सीताबाई**—( सलज्ज होऊन ) हें काय बाई उलटें भाषण? हें आमच्यानें ऐकवत सुद्धां नाहीं. आपणच आपल्यास काय पाहिजे तें ह्मणून घ्यावें.

**श्रीराम**—(विनोदानें) हे हरिणाक्षी, हें भाषण उलटें असें मानूं नको. अपराध्यास दंड करणें हें सरळच आहे. हे प्राणवल्लभे, आतां तूं असें कर कीं हे तुझे गजशुंडेसारखे सरल आणि कोमल असे जे बाहु ह्याच एक प्रकारच्या वल्ली यांहीं करून या अपराध्यास बांधून घाल आणि नंतर नयनकटाक्ष बाणांनीं विकल करून पाड ह्मणजे झालें.

**सीताबाई**—( हर्षानें ) असें मला अन्योक्तीनें कशाला

सांगितलें पाहिजे. मी आज्ञेची वाटच पहातें. ही दासी आज्ञे-प्रमाणें सेवा करण्यास कांहीं मागें सरणार नाहीं.

**श्रीराम**–( हर्षानें ) हे शृङ्गाररसतरंगिणी, असें जर तुझ्या मनांत आहे तर मग उभी राहून त्या मृदुचरणांस कां श्रम देतेस? नतगात्रि ये, पुष्पशय्येवर बैस (प्रियेचा कर-पल्लव धरून मंचकावर बसवितात. )

**सीता**– ( मंद हास्य करून ) चुंबकमण्याकडे लोखंड आपणच येणार, मग हात कशाला लावला पाहिजे? ( असें ह्मणून गळ्यास मिठी मारते.)

**प्रियंवदा**– ( विनोदभरानें ) ज्याप्रमाणें नूतन घ-नाच्या अभ्यंतरीं विद्युल्लता चमकत असते तशी महाराजांच्या इंद्रनीलतुल्य कांतिसमूहांत बाईसाहेबांची तप्तकांचनासारखी प्रभा चमकत आहे. ही अलौकिक शोभा देवांला देखील दुर्लभ ती आह्मी नित्य पहातों मग आमच्या भाग्याला तोटा आहे काय?

**श्रीरामराजा**–प्रियंवदे, तूं फार गोड बोलणारी आहेस, यास्तव तुला प्रियंवदा हें नांव फारच शोभतें.

**मनोरमा**–महाराज, प्रियंवदा केवल आपल्या नांवाप्रमाणें गोड बोलली असें नाहीं. तिचें वर्णन यथार्थ आहे. या समा गमाचें वर्णन केलें तेवढें थोडेंच.

**श्रीराम**–तूंही खरीच मनोरमा आहेस.

**सीताबाई**–प्राणपते, आपण माझें प्राणजीवन असतां

मला टाकून कसे बरें राहिलां. मी मात्र जीवनहीन मीनासारखी तळमळून मोठ्याच कष्टांनीं युगासारखी रात्र घालविली.

**श्रीरामराजा**–( प्रियेस आलिंगून ) प्राणवल्लभे, ती रात्र तुला तरी युगासारखीच वाटली. मी ह्मणतों तो कल्पच गेला. हे मृगशावाक्षी, जसा एकादा मुमुक्षु आत्मप्राप्ति न झाल्यामुळें उद्विग्न होऊन त्याच चिंतनांत गुंग असतो तसाच प्रिये मीही सारी रात्र तुझेंच चिंतन करीत होतों. मला दुसरें कांहींच रुचेनासें झालें. प्रियसखे, काय तुला सांगूं? तुझ्या विरहानें चित्त उचंबळ झाल्यामुळें ज्या कार्यासाठीं राहिलों तें कार्यही व्हावें तसें पुरें झालें नाहीं आणि व्यर्थ मात्र क्लेशांला पात्र झालों. '**इदं च नास्ति न च लभ्यते परं**' असें झाल्यानें रात्रभर झोंप मात्र आली नाहीं.

**सीता**–प्राणनाथ, तापशांतीविषयीं आपल्यास शीतोपचार करत्यें.

( असें ह्मणून अंगावर वाळ्याचें व चंदनाचें उदक शिंपडते आणि पंखा घेऊन वारा घालते. )

**श्रीराम**–प्रियतमे जानकी, या सुकुमार देहास कां श्रम देतेस? संताप अजून आहे काय? तूं सांपडतांच तो निघून गेला. हे हंसगामिनी, जसा एकादा संसारतापानें तप्त झालेला पुरुष ब्रह्मानंदांत निमग्न होऊन सुखी होतो तसा सुकुमार व शीतल अशा तुझ्या गात्रस्पर्शानें मी सुखी झालों आणि तुझ्या अधरामृतपानानें कामज्वरपीडाही दूर घालविली. हे सुंदरांगी, तुझ्या स्पर्शानें मी संतापरहित होऊन

सुखी झालों ह्मणून आश्चर्य नाहीं. तुझा देह हेंच एक सरोवर आहे, त्यांत तुझें सौंदर्य हें उदक, दोन नयन हें मत्स्ययुग्म, मुख हें प्रफुल्ल कमल, कुरलकेश हा शैवाल, स्तन हे चक्रवाक पक्षी, आणि नाभि हा गंभीर आवर्त होय. अशा अतिरम्य सरोवरांत म्या संतप्तानें प्रवेश केला तर संतापशांति कशी न होईल? अथवा हे शृंगारजलवाहिनी, हा तुझा देह नद्यांचा संगम ह्मटलें तरी चालेल. पहा, मुखांत सरस्वती कानांत मनकर्णिका, आणि मस्तकांत वेणी अशा तीन महानद्या तुझ्या देहांत मिळालेल्या आहेत. या करतां तुला तीर्थमय कसें न ह्मणावें? एकादा पांथ मार्ग चालून श्रांत व सूर्याच्या आतपानें तप्त झाला आणि त्यानें कृत्रिमनदींत जर स्नान केलें तर त्याचे श्रमसंताप तेव्हांच दूर होतात आणि मी तर तीन नद्यांच्या संगमांत स्नान केलें मग माझा ताप कसा बरें शांत होणार नाहीं? हे कोमलांगि, हा रत्नदंड तुझ्या हातांस लागून फोड निघाले, यास्तव हें वजन माझ्या हातांत दे आणि तूं विश्रांति घे ह्मणजे झालें.

**सीताबाई**—हें काय बाई विपरीत सांगणें. मला सेवेपासून का श्रम होणार आहेत? या पायांची सेवा मिळते तरी कोणाला? या पायांचें रज ब्रह्मादिकांला स्वप्नांत देखील मिळणें कठिण. अशा ह्या चरणांची सेवा मी केल्यावांचून कशी बरें राहीन?

**प्रियंवदा**—बाईसाहेब, आपण व्यजन कां घेतां? तें आमच्या कडेस देऊन आपण विनोद करावा. वारा घा-

लण्याचें काम आमचें आहे ( असें ह्मणून व्यजन घेते आणि वारा घालते.)

**सीता**–प्रियंवदे, रात्र किती झाली.

**प्रियंवदा**–बाईसाहेब, रात्र किती झाली ह्मणून काय विचारतां? कोंबडा मघाशींच ओरडला, आतां उजेडलें काय असें विचारा.

**सीता**–( मत्सरानें ) अगे, तो विलासिनीचा शत्रु ओ-रडला काय? त्या मेल्याचें तळपट होवो.

**प्रियंवदा**–राणीसाहेब, कालमानास त्यानें काय करावें? त्यानें आपल्या जातिस्वभावाप्रमाणें प्रभाताची सूचना केली.

**सीताबाई**–( शुद्धीवर येऊन ) खरेंग बाई, हा माझाच वेडेपणा, प्रभात झाला हें प्रमोदभरानें मलाच समजलें नाहीं.

( तदनंतर श्रीरामराजा नित्यकर्म आटपून राजसभेस जाण्याकरितां सीताबाईचा निरोप घेतात.)

**श्रीरामराजा**–मला राजसभेस जाण्यास निरोप आहेना?

**सीताबाई**–( आसनावरून उठून ) आपल्या मर्जीबा-हेर माझें ह्मणणें कोणतेंच नाहीं. आतां एवढेंच कीं या दासीला विसरूं मात्र नये.

**श्रीरामराजा**–प्राणवल्लभे, कदाचित् माझ्या देहाला विसरेन परंतु तुला विसरणार नाहीं ( असें सांगून रथांत बसून सभेस येतात ).

---

## प्रवेश ४.

### स्थल—श्रीरामसभा.

### पात्रें.

श्रीरामचंद्र..........................राजा.

विजयक ..........................रामाचा सेवक.

सुवर्णादिक धातु व मुक्तादिरत्नवर्ग.

( इतक्यांत श्रीरामराजा सेवकासह सभास्थानीं येऊन सिंहासनावर बसतात. सभ्यसमाज उठतो. इतक्यांत विजयक येऊन प्रणिपात करतो ).

**विजयक**—महाराजांचा जय असो !

**श्रीरामराजा**—विजयका, काय आहे रे वर्तमान ?

**विजयक**—महाराज, स्वर्णादिक धातु आणि मुक्तादिक रत्नें राजद्वारीं येऊन आज्ञेची प्रतीक्षा करीत आहेत.

**श्रीराम**—जा, त्यांनां माझ्या समोर घेऊन ये (उभयवर्ग राजा समोर प्राप्त होतात ).

**सुवर्ण**—( नम्र होऊन ) राजाधिराज रघुपते, चरणाचा दास सुवर्ण रौप्यादि भावंडांसह आपल्या चरणीं नम्र होतो.

**श्रीराम**—धातुवर्गहो, तुमची निरंतर वृद्धि असो व तुमच्यापासून लोकव्यवहारसिद्धीस प्रतिबंधकता नसो.

**हीरक**—( हात जोडून ) लोकनाथा, धर्ममूर्ते, हीरक नांवाचा किंकर आपल्या पद्मरागादि सहोदरांसह पादपद्मीं लीन होतो.

**श्रीरामराजा**—हीरकादि रत्नवर्गहो, तुमच्या कल्याणाची वर्धमानता असो व तुमच्या योगानें सर्व जनांस शोभा प्राप्त होऊन तुमची कीर्ति लोकांत विस्तृत असो.

**सुवर्ण**—महाराज, आज्ञा असेल तर आपल्या चरणाकडे दासाची एक विनंति आहे.

**श्रीराम**—प्रतिबंध नाहीं, काय असेल तें सांग.

**सुवर्ण**—महाराज, या भगवत्सृष्ट प्राणिमात्रांत राजा श्रेष्ठ हें निर्विवाद आहे. कारण प्रजापालनार्थ त्याची ईश्वराकडून योजना आहे. जर दंडधर्ता राजा नसेल तर लोकांत नानाप्रकारें कलह उत्पन्न होतील, दुष्ट तस्कर प्रजांस पीडा करितील, बलवान् निर्बलांस नानाप्रकारचे उपद्रव देतील, एवंच अराजक लोकांमध्यें बलवत्तर पीडा उपस्थित झाल्यानें प्रजा भयानें उपद्रुत होतील. या कारणास्तव परमेश्वरानें इंद्रचंद्रादिक देवांच्या मात्रा एकत्र करून राजा उत्पन्न केला. तो आत्मसामर्थ्यानें सर्व प्राणिमात्रांस शासन करण्याकरितां समर्थ न होईल असें होणार नाहीं. स्मृति अशी आहे कीं, 'यस्मादेषां सुरेंद्राणां मात्राभ्यो निर्मितो नृपः। तस्मादभिभवत्येष सर्वभूतानि तेजसा' एवंच राजा आत्मतेजानें सर्वातिशायी असल्या कारणानें त्याची आज्ञा उल्लंघन करण्यास कोणीच समर्थ होणार नाहीं आणि राजाही परमेश्वराचे मर्यादेस्तव स्वतंत्र असतांही अधर्म करण्यास शकणार नाहीं. याविषयीं प्रमाणः 'व्यवहारान्नृपः पश्येद्विद्वद्भिर्ब्राह्मणैः सह। धर्मशास्त्रानुसारेण क्रोधलोभविवर्जितः' या प्रकारें

ईश्वरनिर्मित राजांचे धर्म स्मृतींत सांगितले आहेत. त्यांप्रमाणें सर्व नृपती वागतात. आपण तर साक्षात् परमेश्वर राजांचे व तन्नियामक धर्मशास्त्राचे उत्पादकच आहांत, याकरितां आपल्याकडून अधर्म कधींच होणार नाहीं. असा भरंवसा बाळगून आपल्या चरणाकडेस आलों आहों. महाराज, विनंति कोणती ह्मणाल तर सांगतों. एका सभ्यसमाजांत आमच्या वर्गाचा आणि मुक्तादि रत्नवर्गाचा बलवत्तर विवाद उत्पन्न झाला. तो मिटविण्यास त्या समाजांत असणारे सभ्य व पंडित असमर्थ होऊन ते सुद्धां त्याच्या निराकरणासाठीं आमच्या बरोबर एथें आले आहेत. तर आपण कृपाकरून अभेदबुद्धीनें विचार करावा आणि आमचा विवाद मिटवावा, अशी आपल्या चरणाकडेस आमची प्रार्थना आहे ती सुफल करावी.

**श्रीरामराजा**–( विनोदानें हास्य करून ) हे धातुपते, सुवर्णा, हे रजता, हे ताम्रका, हे आरकूटा[1], हे कालायसा[2], हे सीसका, हे वंगा[3], हे अखिलधातुवर्गहो, तुमचा त्या रत्नसमूहाबरोबर कां बरें विवाद उत्पन्न झाला? मनांत विचार करून पाहिलें असतां तुमचा त्या रत्नांशीं कलह होण्यास कांहींच कारण दिसत नाहीं आणि प्रयोजनही नाहीं. न्यायाचा विचार केला तर बीजप्रयोजनावांचून कोणताच भाग उत्पन्न होत नाहीं, असें असतां हा तुमच्यांत तंटा उत्पन्न तरी कसा व्हावा?

---

१ पित्तळ. २ लोखंड. ३ कथिल.

**सुवर्ण**—स्वामिन्, आपलें बोलणें यथार्थ आहे. बीजप्रयोजनावांचून कांहींच असत नाहीं. प्रस्तुत वादाचें बीज हेंच कीं ही निरंतर माझ्या आश्रयानें वागणारी मुक्ता माझ्याशीं समता धारण करते. महाराज, हें मला कसें सोसेल?

आर्या ( गीति. )

**मुक्तेशीं समता हा केविं करिल कनक नरपते सह्य[1] ।**
**श्वानांशीं सिंह जसा अथवा स्वल्पोपेलासवें[2] सह्य[3] ?**

धर्ममूर्ते रघूत्तमा, यावांचून कलहाचें प्रयोजन कांहींच नाहीं.

**श्रीरामराजा**—(हास्य करून) हे धातुपते सुवर्णा, तूं सर्वगुणांचें क्रीडास्थान आहेस व तुझ्यापासून सर्व प्राणिमात्राचीं कामें सिद्धीला पोहोंचतात, आणि तुझ्यावांचून लोकांची व्यवहारसिद्धीही होत नाहीं व तुझ्या आश्रयानें मुक्तादिक रत्नसमूहास विशेष शोभा येत असते असा तूं बहूपयोगी आहेस. परंतु या अभिमानाचा त्याग जर न करशील तर तुझ्या सर्व गुणांचें मातेरें होऊन जाईल. पहा, कनका, तूं रत्नांला आश्रय दिलास या पासून तुला एवढा अभिमान झाला, तर ज्याच्या प्रकाशानें सर्व लोकतंत्रें चालतात त्या सूर्याला किती बरें अभिमान असावा? जी पृथ्वी स्थिरजंगमात्मक विश्वाला आपल्या पृष्ठीवर वहाते, जिच्या आश्रयावांचून लोकांला अन्य गतीच नाहीं, जी नानाप्रकारचे अपघात सहन करून निर्मत्सर रहाणारी, त्या पृथ्वीनें किती गर्व धरावा? त्याचप्रमाणें आकाश, उदक, अग्नि, वायु

१ सहन. २ लहान दगडाबरोबर. ३ सह्यनामक पर्वत.

इत्यादिक ईश्वरनिर्मित जे पदार्थ ते लोकांवर किती बरें उपकार करणारे आहेत ? त्यांच्यावांचून लोकांचें जीवन देखील होणार नाहीं, असें असतां ते त्या लोकोपकारी गुणांमुळें कधींच उद्धत होत नाहींत. याचें कारण ईश्वरानें जे आपणास गुण दिले आहेत ते केवल लोकोपकारार्थच आहेत. याकरितां त्याच्या इच्छेप्रमाणें आपण वागून त्यानें दिलेल्या अधिकारानुरूप त्याचीच चाकरी केली पाहिजे, ह्मणजे त्याप्रमाणें तो प्रभू आपणास वेतन देणार. जसा राजा आपल्या सेवकास अधिकार देऊन कामावर नेमतो व काम केल्याप्रमाणें वेतन देतो आणि तद्विपरीत वागणारास कामापासून दूर करतो तसा परमेश्वरही आपल्या नियमाबाहेर वागणाऱ्या जीवास अधिकारापासून भ्रष्ट करितो. असा विचार करून सत्पुरुष ईश्वराच्या नियमाप्रमाणें वागतात, व त्यांच्या देहांत गर्वाचा लेशही उत्पन्न होत नाहीं. कनका, तूं असा विचार कर कीं आपला अधिकार ईश्वराधीन आहे, तो कांहीं स्वतंत्र नाहीं. मग अशा अधिकाराचा गर्व कशासाठीं धरावा ? कधींच धरूं नये. कार्तस्वरा, या माझ्या सभेंत बहुत प्रकारचे लोक आहेत यांत कोणाशीं कोणी वैर करीत नाहींत, कोणाशीं कोणी कलह करीत नाहींत. साम्यवैषम्य सोडून सगळेच पहा कसे मित्रभावानें वागतात. या सर्वांनीं अभिमानास अगदींच आश्रय दिला नाहीं याकरितां हे मला आवडले. जर हे साभिमान असते तर या सभेस योग्य झाले नसते. हाटका, तुलाही सांगतों कीं तूं अभिमान सोडून

या मुक्तादिक रत्नजातीबरोबर मित्रभावानें वागत जा आणि परमेश्वरानें दिलेला अधिकार भोगीत जा ह्मणजे ईश्वरापासून तुझें कल्याण होईल.

**सुवर्ण**—( हात जोडून ) महाराज, परमेश्वर ह्मणून आपल्याहून निराळा आहे काय? आपण निग्रह आणि अनुग्रह करण्याविषयीं समर्थ, या जगाचे प्रभु, अखिल लोकांच्या उद्धारार्थ या रविवंशांत अवतीर्ण झालां आहां. मग हा दास आपली आज्ञा अमान्य करून आणखी कोणीकडे जाणार? ( असें ह्मणून निर्वैर रहातो. )

**श्रीराम**—( रत्नवर्गास अनुलक्षून ) हे मुक्ते, हे विद्रुमा[1], हे हीरका, हे गारुत्मता[2], हे वैदूर्य, हे नील, हे पुष्पराज, हे पद्मराग[3], हे गोमेद, हे सर्व रत्नवर्गहो, तुमच्या समक्ष सुवर्णाला जो बोध केला तो तुमच्या हृदयांत ठसलाच असेल त्याबद्दल आणखी दुसरें सांगायाला नको. परंतु सन्मणीहो, तुह्मांला आणखी एक विशेष गोष्ट सांगतों ती अशी की जो आपल्याहून गुणांनीं विशेष आहे त्याला पाहून खिन्न होऊं नये, त्याचे ते सद्गुण पाहून आनंद मानावा, जो आपल्या पेक्षां गुणांनीं कमी आहे त्याचा उपहास करूं नये, तर त्याच्यावर दयाच करावी, आणि जो आपल्याशीं समान आहे त्याच्याशीं मत्सर सोडून मैत्री करावी ह्मणजे त्या पुरुषास कधींच दुःख होत नाहीं असें नीतिशास्त्रप्रवर्तकांचें ह्मणणें आहे. या करितां जरी तुह्मी मोलानें अथवा तेजानें

---

१ प्रवाल. २ गरुडपाचू. ३ माणिक.

अधिक असलां तरी तत्संबंधी गर्व सोडून सुवर्णवर्गाशीं मैत्रीनें वागत जा. सुवर्णाशीं वैरभाव धारण करणें हें तुह्मांस अनुचित होय; कारण तुमचें व त्याचें समानत्व पूर्वींचेंच आहे. असें जर नसतें तर तुमचें दोघांचें मेलन एक ठिकाणीं कधींच झालें नसतें. आणि वस्तुगत्या या सुवर्णावांचून तुह्मांलाही दुसरी गति नाहीं. कां ह्मणाल तर सुवर्णाशीं संयोग असतां जशी तुमची कांति विशेष दिसते तशी त्यावांचून दिसणार नाहीं. या करितां सर्व अभिमान सोडून सुवर्णाशीं मिळून रहाणें हेंच तुह्माला सर्व प्रकारें श्रेयस्कर आहे.

**हीरक**—( आनंदानें मुक्तेप्रत ) हे भगवति मुक्ते, सारासार विचार जाणणाऱ्या जगत्प्रभूनें जो निवाडा केला तो निर्विवाद आहे यांत कोणतीच अनर्थकता नाहीं असा माझा सिद्धांत झाला. यावर तुझें काय बोलणें आहे?

**मुक्ता**—( नम्र होऊन ) अखिल वस्तूंचें तत्त्व जाणणाऱ्या प्रभूची आज्ञा मलाच कशी अमान्य होईल? मी त्यांच्या पदरजाची दासीच आहें.

**हीरक**—( सुवर्णाप्रत ) धातुपते, महाराजानें निवाडा केल्याप्रमाणें सर्वांची मैत्री होऊन फार आनंद झाला आणि या कार्यांत तुझे आमच्यावर मोठेच उपकार झाले या करतां तुझ्याशीं संधि करणें हेंच योग्य आहे. मित्रा सुवर्णा, नीतिशास्त्र असें आहे:—'उपकर्त्रा शत्रुणापि संधिः कार्यो विपश्चिता । मित्रेणाप्यपकर्त्रा तु न संधिरुपयुज्यते' ह्मणजे उपकार करणारा शत्रू जरी असला तरी त्या-

च्याशीं संधि अवश्य करावा आणि मित्र असून तो अपकार करणारा जर आहे तर त्याच्याशीं संधि मुळींच उपयोगी नाहीं. कार्तस्वरा, तुझे उपकार किती ह्मणून सांगूं? जो सत्वशक्तीच्या योगानें अखिल भुवनांचें पालन करणारा जो दानमानादिकेंकरून बहुत शास्त्रज्ञ ब्राह्मणांचा संतोष करून त्यांच्या आशीर्वादसलिलानें निरंतर अभिषिक्त असतो, आपल्या कीर्तिरूप कौमुदीनें प्रमुदित केलें आहे जगद्रूप कुमुद ज्यानें, इंद्रादि देवगणांच्या मुकुटरत्नद्युतीनें नीराजित आहे पादद्वंद्व ज्याचें, सामंत राजन्यांच्या मस्तकांत असणाऱ्या कुसुममालांच्या रजांनीं धूसरित आहे सिंहासन ज्याचें, परम पवित्र आणि दर्शनीय आहे मूर्ति ज्याची, हृदयांत असणाऱ्या अनुग्रहरूप चंद्राच्या चंद्रिकेप्रत सुचविणारें आहे मंदहास्य ज्याचें, संसारसर्पाचें विष उतरणारा आहे नाममंत्र ज्याचा, अशा राजाधिराज रामचंद्रराजाचें आज तुझ्या योगानें आह्मांला दर्शन झालें आणि पूर्वमैत्रीचें फळ या विरोधांत देखील तुझ्या पासून आह्मांला सांपडलें, यावरून तुझा आश्रय कधींच सोडूं नये अशी जी प्रभूची आज्ञा ती आह्मांस यथार्थ दिसून आली आणि त्याचप्रमाणें 'उपजीव्यविरोधेन न कुतश्चिदलं स्थितिः' अशी नीतिशास्त्रप्रवर्तकांची जी उक्ति तीही आमच्या प्रत्ययास आली. कारण तुझ्यापासून आमची उपजीविका, मग तुला उपजीव्याला सोडून आह्मीं कोणीकडे रहावें? तस्मात् तुझा आश्रय आह्मी कधींच सोडणार नाहीं आणि तूंही आह्मांला विसरूं नको ह्मणजे झालें.

**सुवर्ण**–( हर्षानें ) मित्रा हीरका, हे सखे मुक्ते, मी तुह्मांला कधींच विसरणार नाहीं. श्रीरामचंद्रराजाच्या कृपेनें आमची मैत्री चंद्रदिवाकर असतील तोंपर्यंत अखंड चालावी एवढेंच मागतों. ( सभ्यांप्रत ) सभ्यांनो, हा दोघांचा संधि तुह्मांस प्रिय वाटला ना?

**सभ्य**–( आनंदानें ) खरोखरच तुमचा संधि पाहून आह्मांस आनंद झाला, व एकंदरींत आज रामचंद्रप्रसादानें आमचे मनोरथ परिपूर्ण झाले व महाराजांची मनोहर मूर्ति पाहून जन्माचेंही साफल्य झालें. आतां महाराजांचा निरोप घेऊन स्वस्थानीं जावें हें चागलें.

**सुवर्ण**–(श्रीरामराजापुढें हात जोडून) महाराज, दासांस कांहीं आज्ञा असेल तर सांगावी.

**श्रीरामराजा**–आज्ञा कशाची? सांगितलेल्या बोधावर दृष्टि ठेवा ह्मणजे झालें?

**सुवर्णादिक**–आज्ञा महाराज.

( सर्व उठून जातात. )

**हेममुक्तासंवाद संपूर्ण.**